


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक - श्री. ह. ल. निपुणगे

अंक - २८१ - एप्रिल - मे - जून १९९८

" २८२ - जुलै - ऑगस्ट - सप्टेंबर १९९८

" २८३ - ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर १९९८
(दिवाळी अंक १९९८)

अनुक्रमणिका

# हाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक - २८१ / एप्रिल, मे, जून १९[illegible]



'माणूस'कार श्री. ग. माजगावकर

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


महाराष्ट्र
साहित्य
परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८१ - एप्रिल-मे-जून १९९७

■

**संपादक**
ह. ल. निपुणगे

**संपादन समिती**
डॉ. शं. रा. राणे
डॉ. मधुकर हसमनीस
रत्नाकर कुलकर्णी
प्रा. भगवान ठाकूर
डॉ. सु. प्र. कुलकर्णी
डॉ. अरविंद संगमनेरकर

■

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

अनुक्रमणिका



# अनुक्रम



□

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१
मुखपृष्ठ-मांडणी : स. म. जंगम □ मुखपृष्ठ छायाचित्रकार : दिलीप कुलकर्णी
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९
मूल्य : रुपये तीस □ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- □ वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

ह. ल. निपुणगे

# संपादकीय

. ना. गो. चापेकर, द. वा. पोतदार, मा. त्र्यं. पटवर्धन, रा. श्री. जोग, श्री. म. माटे, रा. शं. वाळिंबे, दि. के. वेडेकर, श्री. के. क्षीरसागर इत्यादी नामवंत दिवंगत संपादकांनी आणि अलिकडच्या काळात डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. आनंद यादव, श्री. वि. स. वाळिंबे, श्री. शंकर सारडा यांसारख्या साहित्य क्षेत्रातील ख्यातनाम व्यक्तींनी भूषविलेल्या महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकपदी म. सा. परिषदेच्या कार्यकारिणीने माझी नियुक्ती करून माझ्यावर या थोर संपादकांची परंपरा पुढे चालविण्याची मोठी अवघड जबाबदारी टाकली आहे. संपादन मंडळाच्या सहकार्याने हे संपादनकार्य यशस्वीपणे सांभाळण्याचा मी प्रयत्न करीन.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हेतू मुख्यत: साहित्य समीक्षा हाच आहे. तरीही आता बदलत्या काळानुसार या संपादनाची दिशा थोडी बदलून या पत्रिकेला ललितरूप देणे गरजेचे वाटू लागले आहे. त्या दृष्टीने अलिकडच्या काळातील संपादकांनी विशेषत: सर्वश्री वि. स. वाळिंबे आणि शंकर सारडा यांनी प्रयत्नही केले आहेत. तोच धागा पुढे ओढून मी माझ्या संपादन काळातील अंक वाचनीय करण्याचा प्रयत्न करणार आहे.

वाचकांना आकृष्ट करण्यासाठी अलिकडे मुद्रणसौष्ठव हा महत्त्वाचा निकष आहे. साहजिकच महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या साहित्यमूल्यांबरोबरच निर्मितीमूल्यांकडेही लक्ष देणे अगत्याचे आहे. म्हणूनच यापुढील अंक जास्तीत जास्त देखण्या स्वरूपात सादर करण्याचा प्रयत्न राहील. किमान अंक हाती आल्यावर तो चाळावासा तरी वाटावा आणि चाळता चाळता तो वाचावासाही वाटावा; यासाठी चांगला, सकस, वैविध्यपूर्ण मजकूर देण्याचाही प्रयत्न राहीलच.

यात एक अडचण आहे. अंक देखणा काढावयाचा म्हणजे वाढत्या खर्चाला सामोरे जाणे आले. या अंकासाठी विशिष्ट रक्कम ठरविलेली असते. त्या रकमेतच हा सर्व खर्च बसवावा लागतो. वाढती महागाई, टपालखर्चाचा वाढता बोजा यासाठी अधिक रक्कम हवी असते. ती जाहिरातरूपाने आणि सभासदांनी पत्रिकेसाठी देणग्या देऊन उभी करणे शक्य आहे. त्यासाठी प्रयत्नही चालू आहेत. सभासदांनी याबाबत सहकार्य करावे, अशी अपेक्षा आहे.



अनुक्रमणिका

'माणूस' या वैचारिक आणि दर्जेदार साप्ताहिकाचे संपादक श्री. ग. माजगावकर यांचे नुकतेच दु:खद निधन झाले. त्यांनी केलेल्या साहित्यिक कामगिरीचे यथायोग्य दर्शन घडविणारे त्यांच्या निकटवर्तीयांचे या अंकातील लेख हे या अंकाचे वैशिष्ट्य ठरावे. मुखपृष्ठावरील कै. माजगावकरांचे रंगीत छायाचित्र त्यांचे चिरंजीव श्री. धनंजय माजगावकर यांनी उपलब्ध करून दिले. हे छायाचित्र प्रसिद्ध छायाचित्रकार श्री. दिलीप कुलकर्णी यांनी घेतलेले आहे. ते त्यांनी छापण्यास अनुमती दिली त्याबद्दल त्यांना धन्यवाद ! शिवाय या अंकात विविध वाचनीय मजकूर आहेच. त्यातील वैविध्य वाचकांच्या लक्षात येईलच.

खरोखरच मराठी साहित्याचा प्रसार आणि प्रचार कमी पडतो आहे. मराठीत इतकी चांगली आणि दर्जेदार साहित्यनिर्मिती होत असूनही इतर भारतीय भाषांतील साहित्यिकांना जो मानसन्मान मिळतो तितका मराठी साहित्यिकांना मिळत नाही. ज्ञानपीठ पारितोषिक आतापर्यंत फक्त दोनच मान्यवर साहित्यिकांना मिळाले - कै. वि. स. खांडेकर आणि श्री. वि. वा. शिरवाडकर - कुसुमाग्रज. मराठी साहित्यिकांत ज्ञानपीठ पारितोषिक मिळण्यासाठी आणखी कोणी साहित्यिक नाहीत का? या अंकात आम्ही वाचकांचे विचार जाणून घेण्यासाठी एक आवाहन केले आहे. ते वाचकांनी अवश्य वाचून आपले विचार म. सा. पत्रिकेसाठी लिहून पाठवावेत अशी अपेक्षा आहे.

अलिकडच्या काळात काव्यवाचनाचे विविध कार्यक्रम होत आहेत. अशा कार्यक्रमांना प्रतिसादही उत्तम मिळतो आहे. त्याचप्रमाणे कथाकथनाचे आणि कादंबरी वाचनाचेही कार्यक्रम गावोगावी व्हायलां हवेत. साहित्य प्रसारासाठी केलेल्या अशा वैविध्यपूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रमांची टिपणी आपण म. सा. पत्रिकेकडे पाठविल्यास योग्य त्या मजकुराला प्रसिद्धी दिली जाईल. विविध विद्यापीठाच्या मराठी साहित्य शाखेत मान्य झालेल्या विविध प्रबंधांविषयी (डॉक्टरेट) अल्प परिचयासह प्रबंधाचे वैशिष्ट्य सांगणारी टिपणी पाठविल्यास तिलाही योग्य वाटल्यास प्रसिद्धी दिली जाईल.

एकंदरीत मराठी साहित्याच्या विकासासाठी आणि उत्कर्षासाठी होणाऱ्या कोणत्याही लक्षवेधी उपक्रमाला प्रसिद्धी देऊन साहित्याच्या प्रसाराला आणि प्रचाराला हातभार लावण्याचे काम करणे हे म. सा. पत्रिकेचे उद्दिष्ट राहील. अर्थात हे सर्व वाचकांच्या आणि लेखकांच्या, समीक्षकांच्या सहकार्यावरच अवलंबून आहे.

सत्तरावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन जानेवारी १९९७ मध्ये श्री. ना. सं. इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले. या संमेलनाच्या यशात मा. श्री. यशवंतराव गडाख आणि म. सा. प.च्या कार्यकारणीचे सदस्य डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांचा सिंहाचा वाटा आहे. विशेष म्हणजे या संमेलनात मराठी पुस्तकांची तडाखेबंद विक्री झाली. वाचन-संस्कृती टिकून राहण्याची ही सुचिन्हे आहेत. या घटनेची नोंद मोठ्या गौरवाने घेणे अगत्याचे आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ९१ वा वर्धापनदिन तीन दिवसांच्या (२५, २६, २७ मे) वैविध्यपूर्ण आणि भरगच्च कार्यक्रमाने साजरा झाला. त्याआधी म्हणजे २२ मे, ९७ रोजी म. सा. प.ने सुप्रसिद्ध कादंबरीकार व्यंकटेश माडगूळकर यांच्या कादंबरीवरील 'बनगरवाडी' हा

चित्रपट निवडक निमंत्रितांना आणि म. सा. प.च्या स्थानिक सभासदांना विनामूल्य दाखवून मराठी चित्रपटसृष्टीतील होणाऱ्या नाविन्यपूर्ण बदलाची योग्य ती दखल घेण्याचे औचित्य दाखविले, यावद्दल मराठी साहित्यसृष्टीत समाधान व्यक्त करण्यात आले. याच वेळी सकाळ वृत्तपत्रसमूहाचे प्रमुख संपादक श्री. विजय कुवळेकर यांची कथा, पटकथा, संवाद असलेल्या 'रावसाहेब' या चित्रपटाचा सर्वोत्कृष्ट मराठी चित्रपट म्हणून गौरव झाला, याचाही अभिमान वाटतो. विजय कुवळेकर यांचे हार्दिक अभिनंदन. याचबरोबर 'दोघी', 'कथा दोन गणपतरावांची' हे चित्रपटही गाजत आहेत. मराठी चित्रपटात पडत असलेली ही मोलाची भर आहे.

तीन दिवसांच्या कार्यक्रमात साहित्यविषयक विविध कार्यक्रम सादर करणाऱ्या 'रंगत-संगत', 'काव्यशिल्प', 'साहित्यप्रेमी भगिनीमंडळ' इत्यादी संस्थांनी सादर केलेला कार्यक्रम; 'एकविसावे शतक आणि मराठी साहित्याचे भवितव्य !' यावर डॉ. आश्विनी धोंगडे यांनी केलेले बीजभाषण आणि त्यावर डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. आनंद यादव, श्री. ह. मो. मराठे, डॉ. अंजली सोमण, प्रा. रवींद्र घवी यांनी मांडलेले विचार आणि प्रा. रा. ग. जाधव यांनी केलेला समारोप हे वैशिष्ट्य होय.

म. सा. परिषदेचा पारितोषिक वितरण समारंभही यावेळी गाजला. श्री. हरि नरके यांचे नेटके सूत्रसंचालन, आणि पारितोषिक विजेत्या लेखकांना आपली मनोगते व्यक्त करण्याची मिळालेली संधी यामुळे श्रोतृवर्गात समाधान व्यक्त झालेले दिसले. अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांचे मुद्देसूद अध्यक्षीय भाषण हे या कार्यक्रमाचे वैशिष्ट्यच.

दिनांक २७ मे ९७ चा वर्धापनदिनाचा मुख्य कार्यक्रम महात्मा फुले सभागृहात साजरा झाला. श्री. गोपीनाथ तळवलकर यांना म. सा. प. पारितोषिक प्रदान करण्यात आले. याचवेळी कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कारही गोव्याचे श्री. शशिकांत नार्वेकर यांना देण्यात आला. प्रमुख पाहुणे डॉ. मधुकर आष्टीकर यांच्या हस्ते स्मरणिकेचे प्रकाशन झाले.

परिषदेचे सध्याचे प्रमुख कार्यवाह श्री. राजा फडणीस यांनी गेली १५-२० वर्षे परिषदेसाठी भरीव कार्य केले आहे. साहित्यिक सहाय्य निधीसारख्या महत्त्वाच्या योजना राबविल्या आहेत. परिषदेच्या भरभराटीला त्यांचा मोठाच हातभार लागला आहे. त्यांनी नुकतेच एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले आहे. त्यांचा म. सा. प. च्या अध्यक्षांच्या हस्ते शाल-श्रीफळ देऊन सत्कार करण्यात आला. या प्रसंगी त्यांनी म. सा. परिषदेला रु. १५०००/- ची देणगी जाहीर केली.

परिषदेचे कार्यकारी विश्वस्त श्री. म. श्री. दीक्षित यांनी परिषदेत प्रवेश केला त्याला नुकतीच पन्नास वर्षे पूर्ण झाली आहेत. विविध पदांवर काम करीत करीत आज ते या पदावर पोहोचले आहेत. त्यांचाही २७ मे रोजी सत्कार करण्यात आला.

पत्रिकेच्या वाचकांनी अंकावद्दलच्या त्यांच्या स्पष्ट प्रतिक्रिया अवश्य कळवाव्यात. निवडक प्रतिक्रियांना पुढील अंकात प्रसिद्धी दिली जाईल.

□□

'माणूस'च्या माध्यमातून त्यांनी अनेक चळवळींच्या लाटा निर्माण केल्या. पण ते नुसत्या चळवळी करणारे चळवळे संपादकही नव्हते. समाजकारण, राजकारण, अर्थकारण, इतिहास, कला, साहित्य, क्रीडा या विषयातले उत्तमोत्तम निवडक साहित्य 'माणूस'मध्ये प्रसिद्ध करून त्यांनी समाज संघटित करण्याचा, त्याच्यात चैतन्य निर्माण करण्याचा आणि समाजात राष्ट्रवादाची पखरण करण्याचा कसोशीने सतत प्रयत्न केला. त्यांच्या या सर्व कार्यामुळे 'माणूस'कार म्हणून त्यांचा लौकिक झाला. एक सडेतोड, कल्पक, जागरूक, कुशल, ध्येयवादी आणि क्रियावान संपादक म्हणून त्यांना प्रसिद्धी मिळाली. त्यांच्या कार्याचं चीज म्हणून त्यांना आगरकर पुरस्कार, आचार्य अत्रे पुरस्कार, ज्येष्ठ पत्रकार पुरस्कार असे अनेक प्रतिष्ठेचे मान-सन्मान देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

त्यांच्या जीवनाचा हा सगळा चित्रपट पाहिला की असे वाटते की त्यांचे जीवन हे एका अर्थाने एक यशस्वी जीवन होते. कृतार्थ म्हणता येईल असे त्यांचे आयुष्य होते. कारण अखेरीला प्रत्येक माणूस हा जीवनात काहीतरी स्वप्न पाहात असतो. काहीतरी करायचे ठरवत असतो. मग ते कौटुंबिक पातळीवर असेल, सामाजिक क्षेत्रातले असेल, सांस्कृतिक संदर्भातले असेल किंवा राष्ट्रीय स्तरावरचे काहीतरी उद्दिष्ट असेल. पण प्रत्येकाचे काहीतरी आपल्यापुरते एक ईप्सित असते. एक ध्येय असते. ते जर तो गाठू शकला किंवा प्रत्यक्षात आणू शकला किंवा निदान ते ध्येय गाठल्याचे समाधान त्याला मिळाले तरी त्याला आपण यशस्वी म्हणतो. आणि या अर्थाने माजगावकर यांचे जीवन सकृतदर्शनी तरी आपल्याला यशस्वी झालेले दिसते.

पण तसे ते खरोखरी होते का, हा खरा प्रश्न आहे. आयुष्याच्या अखेरीला ध्येयपूर्तीचे आंतरिक समाधान त्यांना मिळाले होते का? की 'ध्येय, प्रेम, आशा यांची कधी होतसे का पूर्ती, वेड्यापरी पूजतो आम्ही या भंगणाऱ्या मूर्ती' अशी त्यांची अवस्था होती? कारण सामाजिक आणि राजकीय परिवर्तनाच्या हेतूने आणि आपले राष्ट्रवादी विचार मांडण्यासाठी त्यांनी मोठ्या धैर्याने 'माणूस'ला जन्म दिला होता. आपल्या रक्ताचे पाणी करून, कष्टाचे डोंगर उपसून तो 'माणूस' त्यांनी पोसला होता, वाढवला होता आणि मोटा केला होता आणि तोच 'माणूस' पंचवीस वर्षांचा झाल्यानंतर त्यांना बंद करावा लागला होता. हरतऱ्हेचे उपाय करून, कल्पना लढवून, प्रयत्नांची शिकस्त करूनही त्यांचा आवडता 'माणूस' त्यांना वाचवता आला नाही. माणूसचा मृत्यू त्यांना टाळता आला नाही. परवा त्यांचे बंधू दिलीप माजगावकर मला म्हणाले की, 'माणूस was like a baby to him.' माजगावकरांचे 'माणूस'वर अपत्यवत् प्रेम होते आणि अपत्याच्या मृत्यूचे दुःख किती दारुण असते, हे ते ज्यांनी भोगले आहे, त्यांनाच कळते. पण 'माणूस' हे माजगावकरांचे केवळ अपत्य नव्हते. ते त्यांचे स्वप्न होते. ते वर्षानुवर्षे प्रत्यक्ष जगत असलेले, अनुभवत असलेले ते स्वप्न होते आणि अशा प्रियतम स्वप्नाचा मृत्यू, जिवलग अशा ध्येयाचा मृत्यू, एखाद्या विचाराचा किंवा कल्पनेचा मृत्यू हा मनस्वी माणसाला प्रत्यक्ष हाडामासाच्या माणसाच्या मृत्यूपेक्षाही अधिक यातना देत असतो. म्हणूनच 'माणूस' बंद पडल्यावर माजगावकरांची प्रकृती हळूहळू खालावत गेली, असे मला वाटते.

त्यांच्या निधनानंतर आलेल्या लेखांत मी वाचले की ते वारले त्याच्या आठ दिवस

अगोदरसुद्धा रुग्णालयातल्या त्यांच्या शय्येवर 'माणूस'चे पुनरुज्जीवन वार्षिक स्वरूपात पुन्हा करावे अशी कल्पना त्यांच्या मनात घोळत होती. ती त्यांनी भेटायला आलेल्या मित्रमंडळींना बोलूनही दाखवली होती. म्हणजे 'माणूस' बंद करावा लागला याचा सल, याचे शल्य, त्याची व्यथा, ते दु:ख शेवटपर्यंत त्यांच्या मनात होते.

पण हे दु:ख काही माजगावकरांचं वैयक्तिक दु:ख नाही. माणूस बंद पडला, त्याची उत्तरक्रिया त्यांच्या हयातीत त्यांना करावी लागली ही काही त्यांच्या वैयक्तिक जीवनातील शोकांतिका नाही. ते काही त्यांचे वैयक्तिक अपयश नाही. तो काही माजगावकर या एका व्यक्तीचा पराजय नाही. ती एक सामाजिक शोकांतिका आहे. विशेषत: आपण जे सर्व जाणकार, सुबुद्ध लोक इथे आज जमलेलो आहोत, आणि आपल्यासारखेच जे असंख्य विचारी, सुसंस्कृत लोक जे इथे आलेले नाहीत, पण ज्यांना 'माणूस' बंद पडल्यावर हळहळ वाटली, त्या सर्व बुद्धिजीवी लोकांचे हे अपयश आहे. समाजहिताची कळकळ असणाऱ्या सर्व सुशिक्षितांचा हा पराजय आहे. त्यांच्या कार्याबद्दल सहानुभूती बाळगणाऱ्या, त्यांचे गोडवे गाणाऱ्या, त्यांचा उदोउदो करणाऱ्या सर्व लोकांची, विचारवंतांची, ध्येयवादी लोकांची ही शोकांतिका आहे.

विशेष म्हणजे, ही शोकांतिका काही पहिल्यांदाच घडलेली नाही. तिलाही एक लाजिरवाणी परंपरा आहे. समाज प्रबोधनासाठी निघालेली अनेक मासिके, नियतकालिके, वृत्तपत्रे आत्तापर्यंत आपल्याकडे बंद पडलेली आहेत. इथे मला ज्ञानप्रकाशचे उदाहरण आठवते. त्यासंबंधी हृदयनाथ कुंझरूंची एक आठवण आहे. ज्ञानप्रकाश हे सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीचे नियतकालिक. हृदयनाथ कुंझरू हे सोसायटीचे अध्यक्ष. काही विचारवंत धुरीण मंडळी त्यांच्याकडे गेली नि म्हणाली, 'ज्ञानप्रकाश हे इतकं चांगलं आहे ते बंद का केलं. ते बंद करू नका.' त्यावर कुंझरूंनी एकच प्रश्न विचारला, 'तुमच्यापैकी ज्ञानप्रकाशचे वर्गणीदार कोण आहेत, त्यांनी हात वर करावा.' एकानेही हात वर केला नाही. कुंझरू म्हणाले, 'ज्ञानप्रकाश का बंद पडला याचं हे उत्तर आहे.' माजगावकरांनी जेव्हा 'माणूस' टिकविण्यासाठी नाना प्रकारच्या योजना आखून प्रयत्नांची शर्थ केली, वर्गणीदार वाढवण्याची, डिपॉझिट मिळविण्याची पराकाष्ठा केली, तेव्हा साहित्यिक, कलावंत, उद्योजक, व्यावसायिक, राजकारणी, समाजकारणी या जीवनातल्या सर्व क्षेत्रातील, चांगल्या कार्याची वूज राखणाऱ्या समाजातील जाणकार मंडळींची साथ त्यांना लाभली नाही, ही खरी शोकांतिका आहे.

ही शोकांतिका आपल्या समाजात वारंवार का घडते, एखादा ध्येयवादी माणूस समाजजागृतीसाठी, सामाजिक प्रबोधनासाठी स्वत:च्या हिमतीवर नियतकालिक काढतो, ते जीवाचे रान करून चालवण्याचा प्रयत्न करतो, पण अखेरीला ते का चालत नाही, आपण ते का चालू देत नाही याचा अंतर्मुख होऊन जर आपण विचार केला, त्यावर उपाय शोधण्याचा प्रयास केला तरच ती माजगावकरांना वाहिलेली खरी श्रद्धांजली ठरेल.

*(महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे भरलेल्या श्रद्धांजली सभेत अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी केलेले भाषण)*

□□

राजेंद्र बनहट्टी, ४६१/४, सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका

वि. स. वाळिंबे

# नूतन राजधर्माचा निस्सीम उपासक




'माणूस'च्या पहिल्या अंकाचे मुखपृष्ठ

'माणूस'कार हीच श्री. ग. माजगावकर यांची खरी ओळख. स्वेच्छापूर्वक स्वीकारलेल्या व्रताच्या गांभीर्याने त्यांनी 'माणूस'चे संगोपन-संवर्धन केले. या नियतकालिकाच्या निर्मितीमध्ये ते रंगून, रमून गेले होते. 'माणूस'चा प्रत्येक अंक आशयसमृद्ध व्हावा, यासाठी अव्याहत पंचवीस वर्षे ते प्रयत्नशील राहिले आणि त्या संबंधीची आपली उभारी आता ओसरत चालली आहे, हे जाणवू लागताच त्यांनी 'माणूस'ची अवतारसमाप्ती घडवून आणली. त्या गोष्टीला आता दहा वर्षे होऊन गेली आहेत. तरीही अजून 'माणूस'ची आठवण होते, त्याची उणीव जाणवते.

अन्य कोणतेही पाठबळ नसलेल्या व्यक्तीने केवळ आपल्या ध्यासाच्या आधारावर एवढे कर्तृत्व करून दाखवावे, हे विशेषच म्हटले पाहिजे.



अनुक्रमणिका

माजगावकरांचे बालपण व्यतीत झाले ते बडोद्यासारख्या अभिरूचिसंपन्न नगरीत. तेथे शालेय शिक्षण पूर्ण केल्यावर ते महाविद्यालयीन शिक्षणासाठी पुण्याला आले आणि इथेच स्थायिक झाले. महात्माजींच्या हत्येनंतर सरकारने राष्ट्रीय स्वयंसेवक संघावर बंदी घातली. या शासकीय निर्णयाच्या निषेधार्थ संघाने सत्याग्रह सुरू करताच माजगावकरही त्यात सहभागी झाले आणि त्यामुळे त्यांना काही महिने कारावास घडला. येरवडा कारागृहामधल्या कालखंडात माजगावकरांना अनेकांचा निकटचा सहवास लाभला आणि त्यातूनच त्यांनी आपल्या भावी आयुष्याची रूपरेषा पक्की केली. साहजिकच गायनाची मूळची आवड दूर सारणे अपरिहार्य होऊन गेले.

आपण आपल्या समाजाचे काहीतरी देणे लागतो आणि ते आनंदाने आणि अभिमानाने चुकते करण्यात आयुष्याची सार्थकता सामावलेली आहे, हे सूत्र मनात घोळवीतच माजगावकर एम्. ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले; आणि मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी चालविण्यात येत असलेल्या विद्यालयात शिक्षक म्हणून काम करू लागले. आतापर्यंत शिक्षणाची संधी नाकारण्यात आलेल्या समाजघटकांना आधुनिक ज्ञानविज्ञानाशी परिचित करून देण्याचे कार्य त्यांनी अंगभूत उत्साहाने आरंभिले. कालांतराने त्यांच्या प्रकृतीला हे क्षेत्र अपुरे वाटू लागले आणि म्हणून ते एका दैनिक वृत्तपत्राच्या संपादकीय विभागात प्रविष्ट झाले — अनेकविध सामाजिक समस्यांची प्रगल्भ जाण यावी या तळमळीतून.

काहीतरी स्वतंत्र करून दाखविण्याची ईर्ष्या आणि धमक असलेल्या व्यक्तीला चाकरीची बंधने जाचक वाटू लागतात, आपला कोंडमारा होत आहे ही जाणीव अस्वस्थ करू लागते.

माजगावकरांचे तसेच झाले.

लेखन-प्रकाशनाचे क्षेत्र त्यांना खुणावू लागले.

श्री. ग. माजगावकर यांनी 'राजहंस' प्रकाशनाची स्थापना केली आणि या निमित्ताने त्यांचा महाराष्ट्रभर संचार सुरू झाला. आपण एखादे मासिक सुरू केले तर ते प्रकाशन-व्यवसायाला पूरक आणि पोषक ठरू शकेल या विचाराने त्यांच्या मनात मूळ धरले. मासिकाच्या स्वरूपासंबंधी ते अनेकांशी बोलू लागले; आपली कल्पना विशद करू लागले. या सर्व विचारविनिमयातून माजगावकरांनी आपले संकल्पित मासिक कशासाठी या संबंधीचे निवेदन लिहून काढले आणि ते अनेकांकडे मतप्रदर्शनासाठी पाठवले. मुख्यतः वैचारिक साहित्याला वाहिलेल्या मासिकाला वाचकांचा कितपत प्रतिसाद मिळेल, याची काही जणांना साधार शंका वाटत होती. त्यांनी ती मोकळेपणाने माजगावकरांपाशी बोलून दाखविली. माजगावकरांनी आपल्या स्वभावानुसार सगळ्यांची मते शांतपणे ऐकून घेतली.

आणि तरीही ते आपल्या निर्णयासंबंधी अचल राहिले.

१ जून १९६१ या दिवशी 'माणूस'चा पहिला अंक प्रकाशित झाला.

'माणूस' या शीर्षकाखाली लिहिलेले होते — 'मराठी मासिक पत्र'.

आणि वरच्या बाजूला या नियतकालिकाचा जन्महेतू छापला होता - 'अभिराष्ट्रेण वर्धताम्' राष्ट्रजीवन वर्धिष्णू रहावे, या आंतरिक आकांक्षेतून माजगावकर संपादक झाले.



अनुक्रमणिका

मासिकाची पृष्ठसंख्या होती ४०. किंमत पन्नास पैसे, वार्षिक वर्गणी पाच रुपये.

मुखपृष्ठावर पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या 'नवा जीवनमार्ग' या विषयावरच्या व्याख्यानातील भाग दिलेला होता. तो असा :

'कोणती नवी ध्येये किंवा नव्या जगाला अनुरूप होतील अशा रीतीने फेरबदल करून कोणती जुनी ध्येये आम्हाला जनतेपुढे ठेवता येतील आणि जनतेला कशा रीतीने जागृत आणि कार्यप्रवृत्त करणे आम्हास शक्य होईल, हा प्रश्न आमच्यापुढे आहे.'

माजगावकरांनी या पहिल्या अंकात वेगळे संपादकीय लिहिले नव्हते. 'माणूस'च्या संदर्भात त्यांना काही दिवस अगोदर अ. ह. लिमये यांचे पत्र आले होते. ते पत्र त्यांनी उद्धृत केले.

'तुमची कल्पना आणि संकल्प उत्तम आहे. साहित्य, विज्ञान, वाणिज्य, संस्कृती, सर्वांचा समावेश या मासिकात करण्याचे तुम्ही योजिले आहे. पण या बाबतीत डोळसपणाने आणि स्पष्टपणे लिहिणारे जाणकार मिळणे हे काम खडतर आहे.'

माजगावकरांनी लिमये यांच्या या पत्राला जे उत्तर लिहिले तेच 'माणूस'चे पहिले संपादकीय ठरले :

'मी सुरू करीत असलेल्या मासिक व्यवसायातील धोक्याचे कंदील आपण प्रथमच मला दाखविलात, याबद्दल खरोखरच आपले आभार मानावयास हवेत. परंतु का कुणास ठाऊक, मला या तांबड्या कंदिलांची भीती फारशी वाटत नाही. कारण हा काळ अशा प्रकारच्या प्रयत्नांना अनुकूल आहे, अशी ग्वाही माझे मन मला आतून देत आहे. असे नसते तर अपुरे द्रव्य आणि मनुष्यबळाचा तुटवडा या अडचणी असतानाही मी हा धोका पत्करण्यास का तयार झालो असतो?

नवसमाज पुरुषाच्या वेदनेत 'एक स्वर मेरा मिलाके' या भावनेने मी आणि माझे सहकारी या नव्या उद्योगाला प्रारंभ करीत आहोत.

विश्वास आहे की, परमेश्वर आम्हाला काही कमी पडू देणार नाही.'

महाराष्ट्राचे वेगळे राज्य अस्तित्वात आल्याला नुकते कोठे एक वर्ष झाले होते. या प्रदेशाची सूत्रे आता मराठी मातीत जन्मलेल्यांच्या हातात आली होती. हा जसा आनंदाचा भाग होता, तसाच तो नव्या आव्हानांना सामोरे जाण्याच्या कसोटीचाही काळ ठरणार आहे. याची माजगावकरांना कल्पना होती. म्हणूनच ते म्हणत होते, 'सध्याचा काळ अशा प्रकारच्या प्रयत्नांना अनुकूल असल्याची माझे मन मला ग्वाही देत आहे.'

माजगावकर हिंदुत्ववादी होते. डॉ. हेडगेवार आणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी प्रतिपादन केलेल्या विचारसरणीचे निष्ठावंत पाईक होते. त्यामुळे आपली कोणत्या विशेषणाने संभावना केली जाईल, हेही ते ओळखून होते. परंतु त्यांची त्यांना फिकीर नव्हती.

कोणतीही व्यक्ती वा विचारसरणी परिपूर्ण असू शकत नाही, याचे माजगावकरांना 'माणूस'च्या त्या सुरुवातीच्या कालखंडातही सुरेख भान होते. प्रखर राष्ट्रवादाला सामाजिक समतेची, भिन्नभिन्न गटांमध्ये चिरफाळल्या गेलेल्या घटकांमध्ये परस्पर-विश्वासाची साथ लाभली. तरच तो राष्ट्रवाद अर्थपूर्ण आणि फलप्रद ठरू शकेल, असे माजगावकर मानत होते. म्हणून प्रथमपासून त्यांनी



अनुक्रमणिका

त्यांच्याबरोबर खूप चालतो. टिळक, गांधी, आगरकर, लेनिन, मार्क्स, जीना ही सगळी माणसं—त्यांच्याबद्दलचे अनादर बाजूला ठेऊन त्यांच्यातील गुण, देशभक्ती तरुणांपुढे ठेऊन त्यांना विचार करायला लावतो.' 'माणूस' संपादन करताना माजगावकरांपाशी सामाजिक कार्याची आस्था होती. ते स्वत: हिंदुत्ववादी असूनही गांधी विनोबांसारखे उदार समतेचा आग्रह धरणारे होते. म्हणून पुंडलीक त्यांना म्हणायचे की, 'आमचा हा मित्र माजगावकर investigative जर्नालिस्ट आहे. '

अशा विविध दृष्टीकोनातून माजगावकरांच्या संपादक व्यक्तित्वावर 'माणूस'च्या तरुण लेखकांनी आणि त्यांच्या मित्रवर्गाने प्रकाश टाकला. 'माणूस'चा रौप्य महोत्सवी समारंभ म्हणजे एका जिद्दीने आणि वैचारिक पत्रकारितेच्या ध्येयानं चालविलेल्या एका वेगळ्या वाटेच्या तत्त्वाचाच विजय होता. परंतु ही वाट आर्थिक तरतुदीच्या नेहेमीच्या व्यावहारिक बाजूच्या कचाट्यात सापडून दिसेनाशी होण्याइतकी पाळी आली. 'माणूस' बंद होणं हे आमच्यासारख्या सामान्य वाचकांच्या दृष्टीने हानिकारकच होतं. कारण 'माणूस' राजकारणाचे व इतर सामाजिक वेगवेगळे रंग आमच्यापर्यंत पोचवण्याचं काम करत असे. 'माणूस' नंतर असं वैचारिक वारं आमच्यापर्यंत पोचलंच नाही !

१९६७ साली मद्रासमध्ये 'द्रविड मुन्नेत्र कळघम' या नव्या पक्षाची स्थापना झाल्यावर माजगावकरांनी तेथील सामाजिक व राजकीय पाहणी करण्यासाठी विद्याधर पुंडलीक, वि. ग. कानिटकर व श्री. ज. जोशी या त्रयीला तिकडे मुद्दाम पाठवून 'दक्षिणायन' ही नवी लेखमाला

---

श्री कैलास ते सिंधुसागर पदयात्रेचा वेरुळ येथील शुभारंभ : कै. ना. ग. गोरे यांचे समवेत कै. श्री. ग. माजगावकर, श्री. द. मा. मिरासदार आणि कै. विद्याधर पुंडलीक



'सर्वसामान्य वाचकाला विचारप्रवण करणे, आजच्या परिस्थितीची संपूर्ण जाणीव देणे आणि त्याला प्रेरक होतील अशा गोष्टी त्यांच्यापर्यंत पोहोचविणे या गोष्टींची आज अतिशय निकड आहे. आपल्या मासिकाच्या हातून या कामी चांगली कामगिरी व्हावी, असे इच्छितो.'

आपली वैयक्तिक मते काहीही असली तर 'माणूस'चा मंच सर्व प्रकारच्या विचारकांना उपलब्ध असला पाहिजे, या माजगावकरांच्या दृष्टीचा लगेचच प्रत्यय आला. के. एन्. फडके साम्यवादी विचारसरणीचे पुरस्कर्ते मानले जात. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रातल्या ताज्या महत्त्वपूर्ण घडामोडींचे विश्लेषण करणारे सदर माजगावकरांनी के. एन्. फडके यांच्याकडे सोपविले. कारण फडके यांचा व्यासंग ते जाणून होते.

मराठी वाचकांना प्रादेशिक प्रश्नांची आणि ताणतणावांची, राष्ट्रीय पातळीवर घेतल्या जाणाऱ्या निर्णयांची आणि नियोजनांची माहिती व्हावी आणि तिच्या आधारे त्यांनी बदलत्या परिस्थितीसंबंधीची आपली भूमिका आणि दृष्टिकोन ठरवावा इकडे आग्रहपूर्वक लक्ष देत असतानाच जागतिक घटनांचा विशेषत: विसाव्या शतकाला आपापल्या प्रकृतीप्रमाणे आकार देणाऱ्या नेत्यांचा परिचय व्हावा असाही माजगावकरांचा प्रयत्न असे.

हे सारे साहित्य द्यायचे असेल तर मासिक पुरेसे पडणार नाही, हे ओळखून माजगावकरांनी १९६४ च्या सप्टेंबरमध्ये त्याचे पाक्षिकात रूपांतर केले आणि हे पाक्षिक १९६५ च्या जानेवारीपासून पुस्तकाच्या आकारामध्ये प्रसिद्ध होऊ लागले. पुढे १५ ऑगस्ट १९६६ पासून तर 'माणूस' दर शनिवारी प्रकाशित होऊ लागला. पुस्तकाच्या आकाराची ६४ पाने प्रत्येक आठवड्याला प्रसिद्ध करायची म्हणजे विषयांची विविधता आणणे आवश्यक ठरले. सात-आठ वर्षांनंतर म्हणजे १९७४ च्या जानेवारीपासून साप्ताहिक 'माणूस'ने पुन्हा मासिकाचा आकार धारण केला आणि त्याच आकारात तो १९८६ च्या जूनपर्यंत प्रकाशित होत राहिला. त्यानंतर या साप्ताहिकाचे अनियतकालिकात परिवर्तन झाले आणि 'माणूस'चे हे अनियमित दर्शन १९९१ च्या दिवाळी अंकापर्यंत घडत राहिले. मध्यंतरीच्या काळात काही दिवस 'माणूस' आठवड्यातून दोनदा प्रसिद्ध होत असे. परंतु हे अर्धसाप्ताहिक स्वरूप माजगावकरांनी लवकरच आटोपते घेतले.

लोकांच्या विशेष लक्षात राहिला तो १९६६ च्या ऑगस्टपासून १९७३ च्या अखेरीपर्यंत पुस्तकाच्या आकारामध्ये दर शनिवारी वाचायला मिळणारा ६४ पानांचा 'माणूस.'

'माणूस'च्या लोकप्रियतेला पहिली आणि परिणामकारक चालना देण्याचे श्रेय वि. ग. कानिटकरांच्या हिटलरवरच्या 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' या लेखमालेपासून. त्या मालिकेतला पहिला लेख प्रकाशित झाला तो जून १९६४ च्या अंकात. या लेखमालेमुळेच मासिकाचे पाक्षिकात आणि नंतर साप्ताहिकात रूपांतर घडवून आणायची अपरिहार्यता माजगावकरांना प्रतीत झाली.

साप्ताहिकामधले काही लेखन तात्कालिक स्वरूपाचे असले तरी दीर्घकालीन महत्त्वाच्या लेखनाचाही त्यात अंतर्भाव व्हायला हवा याचा 'नाझी' लेखमालेपासून माजगावकरांना अंदाज आला. त्यामुळे पुढे जे लेखन ग्रंथरूपात प्रसिद्ध करता येऊ शकेल असे विषय ते लेखकांना



अनुक्रमणिका

सुचवू लागले.

'सध्या वाचताय काय?' हा श्री. ग. माजगावकर यांचा त्यांच्या कार्यालयात येणाऱ्या लेखकांना पहिला प्रश्न असायचा.

त्या वैचारिक देवघेवीतून त्यांना लेखमालेसाठी विषय सुचत, हिटलरनंतर त्यांनी लेनिन, द गॉल आणि माओ यांच्यावरच्या अशाच प्रदीर्घ लेखमाला प्रसिद्ध केल्या आणि त्याही पुढे पुस्तकरूपात प्रकाशित झाल्या.

माजगावकरांची संपादकीये तशी आटोपशीर असत. प्रचलित विषयावरच्या एखाद्या मुद्द्याभोवती त्यांची मांडणी झालेली असे. 'श्री. ग. मा.' या त्यांच्या आद्याक्षरांनीशी प्रसिद्ध होणारे हे स्फुटलेखन माजगावकरांच्या चिंतनशीलतेची साक्ष देते. म्हणूनच या संपादकीयांमधून त्यांची 'बलसागर', 'नवनिर्माण', 'श्रीग्रामायन' अशी पुस्तके सिद्ध होऊ शकली. एका अंकाची छपाई पुरी होताच पुढच्या अंकाच्या आखणी-जुळणीकडे लक्ष द्यावे लागत असल्यामुळे आपल्या आवडत्या विषयासंबंधी सविस्तर आणि समग्र लिखाण करण्याइतकी फुरसत मिळणे त्यांना अशक्य होते. परंतु केव्हातरी आपण एखाद्या महत्त्वपूर्ण समस्येचा सांगोपांग वेध घेणारा ग्रंथ लिहावा, असे त्यांच्या मनात येई. तसे ते बोलूनही दाखवीत. मात्र, अखेरपर्यंत ते त्यांना जमू शकले नाही. आधी व्यवसायाचा वाढता व्याप आणि नंतर शरीरात प्रवेश केलेल्या व्याधीचा उपद्रव यामुळे हे असे झाले. या संबंधीचा विषाद आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यांना छळत, सलत राहिला.

माजगावकरांची संपादकीय दृष्टी एकांगी नव्हती. आपल्या 'माणूस'ने सतत वेगवेगळ्या विषयांना आणि वाङ्मयप्रकारांना स्पर्श करीत राहिले पाहिजे असे त्यांना वाटे. 'माणूस'च्या पहिल्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेली पुरवणी प्रभातफिल्म कंपनीसंबंधी होती. हंसा वाडकर या गुणी अभिनेत्रीची आत्मकथा लोकांना वाचायला मिळाली ती 'माणूस'च्या अशाच एका दिवाळी अंकातून. 'सांगत्ये ऐका' हे आत्मचरित्र शासकीय पुरस्काराचे मानकरी ठरले तेव्हा लेखिकेइतकाच आनंद झाला तो माजगावकरांना. कारण त्यातून त्यांची संपादकीय दृष्टी आणि प्रकाशकीय प्रकृती यांचे चपखल दर्शन घडत होते. जनमानसाच्या अतीव आदराचा विषय झालेला नेता असो वा आपल्यासंबंधी अलोट आकर्षण उत्पन्न करणारा अभिनेता असो, मुळात तो माणूस असतो आणि त्याच्याकडे या दृष्टिकोनातून पाहिले की त्याच्या आयुष्यातल्या सुसंगतीप्रमाणे विसंगतींचाही उलगडा होऊ शकतो, असे माजगावकर मानत. हंसाबाईंसारख्या मनस्वी प्रवृत्तीच्या कलावतीच्या व्यथावेदनांची कहाणी आपण प्रकाशित करावी, असे माजगावकरांना वाटले ते यामुळेच.

लेखमालांप्रमाणे माजगावकरांनी 'माणूस'चे आणखी एक वैशिष्ट्य निग्रहाने जपले, जोपासले.

जिथे कुठे काही महत्त्वाचे घडत असेल वा घडण्याचा संभव दिसत असेल तिथे माजगावकर 'माणूस' परिवारातल्या कोणाला तरी आवर्जून पाठवत. कधी कधी हा खर्च 'माणूस'च्या खिशाला परवडणारा नसे. परंतु माजगावकरांनी या बाबतीत हयगय केली नाही. 'माणूस'च्या प्रतिनिधीने प्रत्यक्ष जागेवर जाऊन अवलोकन केलेला वृत्तांतच 'माणूस'च्या वाचकांना वाचायला

मिळाला पाहिजे, या बाबतीत ते नेहमीच आग्रही राहिले.

श्रीनगरजवळच्या मशिदीमधल्या प्रेषित महंमदाचा पवित्र केस पळविला जाताच झेलमचे सारे खोरे पेटून उठले. उत्तरेकडच्या सीमावर्ती प्रदेशात धार्मिक विद्वेषाने थैमान मांडताच, या घटनेमागच्या धाग्यादोऱ्यांची उकल करून घेण्याच्या उद्देशाने माजगावकरांनी एका पत्रकाराला थेट श्रीनगर-बारामुलापर्यंत पाठविले आणि तो विस्तृत वृत्तांत दिवाळी अंकात प्रसिद्ध केला — त्या अंकाचा एक लक्षणीय विशेष म्हणून.

१९६७ मध्ये तामिळनाडूत द्रविड मुन्नेत्र कळघम पक्षाची सत्ता प्रस्थापित होताच एका प्रादेशिक पक्षाच्या या विजयाकडे माजगावकरांची शोधक नजर वळली. स्वतंत्र द्राविडीस्तानच्या निर्मितीची बीजे तर या सत्तांतरामध्ये सामावलेली नाहीत ना, हे जाणून घेण्यासाठी श्री. ज. जोशी. वि. ग. कानिटकर आणि विद्याधर पुंडलीक या साहित्यिकांना माजगावकरांनी तिकडे जाऊन येण्यासंबंधी सुचविले. त्या तिघांची वार्तापत्रे 'दक्षिणायन' या शीर्षकाखाली 'माणूस'मध्ये येऊ लागताच वाचकांना दक्षिणेतल्या घडामोडींसंबंधी बरीच नवी माहिती उपलब्ध होऊ शकली. ललित लेखक म्हणून ख्यातनाम असलेल्यांकडे एका राजकीय घटनेची पाळेमुळे शोधण्याची कामगिरी सोपविण्यात माजगावकरांची मार्मिकता दिसून आली.

१९६८ मध्ये माजगावकर एका वेगळ्याच भूमिकेमध्ये लोकांसमोर आले.

आदल्या वर्षी भारतात दुष्काळ पडला होता. जगभरच्या वर्तमानपत्रांमध्ये या दुष्काळाच्या वातम्यांना भरपूर प्रसिद्धी मिळू लागली. भारताकडे अन्नधान्यांच्या मदतीचा ओघ सुरू झाला.

माजगावकरांच्या वाचनात हॉलंडमधील एक बातमी आली—तिथल्या शाळकरी विद्यार्थ्यांनी भारतीय मुलांसाठी धान्य गोळा केले आहे.

डच विद्यार्थ्यांच्या या औदार्याचे माजगावकरांना कौतुक वाटले. परंतु एक भारतीय नागरिक म्हणून त्यांचे अंत:करण खंतावून गेले.

उपखंडाच्या विशाल आकाराच्या या देशातले सत्तर टक्के लोक शेती करीत असताना एका दुष्काळाने या देशाची दैना करून टाकावी, हे त्यांना सहन झाले नाही. परान्नमुक्तीचे आंदोलन आपण प्रवर्तित करावे, असे त्यांच्या मनाने घेतले. 'माणूस'ची जबाबदारी त्यांनी आपले धाकटे बंधू दिलीप यांच्याकडे सोपविली आणि ते थेट वेरुळला जाऊन पोहोचले. तिथले कैलास हे शिल्प म्हणजे प्राचीन भारताचे प्रतीक तर महानगरी मुंबई म्हणजे आधुनिक उद्योगांची अवाढव्य राजधानी.

१९६८ च्या मार्चमध्ये माजगावकरांनी श्रीकैलास ते सिंधूसागर या पदयात्रेला प्रारंभ केला. ते तीन-चार महिने त्यांनी ग्रामीण भागात व्यतीत केले. मुक्काम एखाद्या देवळात, जेवण एखाद्या भूमिपुत्राच्या झोपडीत. केवळ काही दिवस खेडेगावामध्ये काढले की तिथले सारे प्रश्न आपल्याला समजतील, असे मानण्याइतके माजगावकर भाबडे नव्हते. या अशा यात्रा मूलत: प्रतीकरूपच असतात. तरीही त्यांचे म्हणून जनजागृतीच्या दृष्टीने स्वयंसिद्ध महत्त्व असते. सुप्रसिद्ध साहित्यिक दि. बा. मोकाशी माजगावकरांच्या या पदयात्रेत सहभागी झाले-एक नवा अनुभव मिळावा म्हणून. या पदयात्रेमधल्या निरीक्षणांवर आधारलेले मोकाशी यांचे 'अठरा लक्ष पावले' हे

पुस्तक खूपच गाजले.

१९७५ चा उत्तरार्ध आणि संपूर्ण १९७६ हे वर्षे म्हणजे देशावर लादण्यात आलेल्या आणीवाणीचा काळा कालावधी. वृत्तपत्रांनी काय छापायचे आणि काय गाळायचे हे ठरवायचा अधिकार आणीवाणीने पिवळ्या गणवेशातल्या पोलिस अधिकाऱ्यांना बहाल केला होता.

आणीवाणी मागे घेण्यात आल्यानंतर, स्वत:ला बुजुर्ग समजणाऱ्या काही पत्रकारांचे वर्तन त्या कसोटीच्या काळात कशा प्रकारे घडले यासंबंधी लिहिताना लालकृष्ण अडवानी यांनी म्हटले, - 'सरकार पत्रकारांना केवळ वाकून चालायला सांगत होते. परंतु काही मंडळींनी आपण होऊन रांगणे पसंत केले. शासनाची अवकृपा होऊ नये म्हणून.'

त्यातल्या काही जणांनी आपल्या त्या वेळच्या वर्तनाबद्दल जाहीर दिलगिरी प्रदर्शित केली.

माजगावकरांवर अशी वेळ आली नाही.

माणसाचे मुलभूत अधिकार हिरावून घेणाऱ्या शासनयंत्रणेच्या नशिबी अखेर काय येते, याची अनेक उदाहरणे इतिहासात वाचायला मिळतात. तशा प्रकारच्या घटनांना प्रसिद्धी द्यायला कोणीच प्रतिबंध करू शकत नव्हते. माजगावकरांनी त्या तऱ्हेचे लेखन आणीबाणीच्या काळात छापले. यामुळे सद्य:स्थितीसंबंधी त्यांना काय म्हणायचे आहे, याचा वाचकांना उलगडा होत असे. त्या काळाला 'आर डॉक्युमेंट' या कादंबरीचा अनुवाद माजगावकरांनी प्रसिद्ध केला यामागे हाच हेतू होता. आवर्त उफाळून येते, तेव्हा आपली अस्मिता न सोडताही अस्तित्व टिकवून धरता येते, याचा वस्तुपाठ म्हणजे माजगावकरांचे त्या काळातले लेखन.

अपुरे द्रव्य आणि मनुष्यबळाचा तुटवडा या अडचणी असतानाही आपण 'माणूस'चा धोका पत्करत आहोत, अशी माजगावकरांनी पहिल्याच अंकात ग्वाही दिली होती.

त्या प्रतिज्ञेला ते जागले, असेच म्हटले पाहिजे.

उतारवयात पहिली उभारी रहात नाही. अशा वेळी पूर्वपुण्याईवर वेळ निभावून नेणे माजगावकरांना शक्य होते. ते त्यांनी नाकारले.

भलते धाडस करू नका असा स्नेहीजन सल्ला देत असताना त्यांनी जाणूनबुजून धोका पत्करला.

तशी भीती आता राहिली नाही, अशी स्नेहीजन खात्री देत असतानाही माजगावकरांनी 'माणूस'चे प्रकाशन स्थगित केले.

१९६१ ते १९९५ या पाव शतकातल्या मराठी पत्रसृष्टीवर माजगावकरांनी आपली नाममुद्रा उमटवली, हे वास्तव नाकारता येणार नाही.

'माणूस'चे प्रकाशन थांबले. परंतु माजगावकर विस्मरणात गेले नाहीत.

पुण्याच्या प्रेस क्लबने आणि मुंबई मराठी पत्रकार संघाने त्यांचा गौरव केला. कराड इथल्या 'चौफेर'चा आगरकर पुरस्कार, रामभाऊ म्हाळगी प्रबोधिनीचा मधुकरराव महाजन पुरस्कार आणि नाशिकच्या वनशेती मंडळाचा सामाजिक कार्यकर्त्यांचा पुरस्कार हे सन्मानही माजगावकरांना लाभले. भेटले की माजगावकर म्हणत, ' मी एवढेसे केले समाजाने माझे केवढे कौतुक करावे ! अशा वेळी सद्गदित व्हायला होते. '



अनुक्रमणिका

कर्तव्यपूर्तीचे हे अतुलनीय समाधान मनात वागवतच माजगावकर मृत्यूला सामोरे गेले.

तो आपल्याभोवती घोटाळू लागला आहे, याची त्यांना काही दिवसांपासून चाहूल लागली होती. गेल्या २० फेब्रुवारीला माजगावकरांची प्राणज्योत मालविली.

त्यांचे अंत्यदर्शन घेताना जाणवले, पंचवीस वर्षे अनेकांची आधारशिला झालेली विधायक कार्यशीलता आता कायमची कोमेजून गेली आहे.

महिन्यापूर्वीच मी त्यांना रुग्णालयात भेटलो होतो. शस्त्रक्रियेमुळे त्यांना कमालीची अशक्तता जाणवत होती. तरीही माझा हात हातात घेत विचारले, ' सध्या काय लिहिताय? '

या वेळी मात्र माजगावकर काहीच बोलले नाहीत. ते अज्ञाताच्या प्रवासाला निघून गेले होते.

लोकमान्य टिळकांनी एके ठिकाणी म्हटले आहे :

'हिंदुस्थान ही आमची मातृभूमी आणि देवता. हिंदुस्थानवासी हेच आम्हा सर्वांचे बंधुत्वाचे नाते.' ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन आपली राजकीय आणि सामाजिक परिस्थिती सुधारण्यासाठी एकनिष्ठपणाने आणि स्वार्थाकडे लक्ष न देता सतत परिश्रम करणे, हाच आमचा नूतन राजधर्म.'

'गीतारहस्यकारांना अभिप्रेत असलेल्या या नव्या राजधर्माचा आचार आणि प्रचार हाच श्री. ग. माजगावकर यांनी आणि त्यांच्या 'माणूस'ने आपला जीवितहेतू मानला.

□□

वि. स. वाळिंबे, १०४७ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.





अनुक्रमणिका

वि. ग. कानिटकर

# संपादक माजगावकर



संपादक म्हणून कै. श्री. ग. माजगावकर यांचे ठिकाणी अनेक गुण होते. पहिली गोष्ट साप्ताहिक व पाक्षिक काढण्यामागे त्याचा विशिष्ट हेतू होता व तो स्पष्ट आणि निश्चित होता. कै. माजगावकर यांच्यावरील मृत्यूलेखात 'महाराष्ट्र टाईम्स'च्या संपादकांनी लिहिले आहे - 'त्यांची समाजाला भिडण्याची पद्धत वैचारिक औद्ध्यातून आलेली नव्हती. त्यांची स्वत:ची अशी एक वैचारिक आणि मूल्यात्मक बैठक होती... स्वत:चे विचार जगाला सांगण्यासाठी त्यांनी 'माणूस' सुरू केले नाही.' हे वरोबर आहे. परंतु 'वैचारिक व मूल्यात्मक बैठक' नेमकी काय होती? याचा शोध घेतला तर असे दिसेल की जो वाचकवर्ग शहरातून व ग्रामीण भागातून नव्याने पुढे येत होता, या वर्गात, सामाजिक आत्मियतेची जाणीव निर्माण करून लोकशाही आणि राष्ट्रवादाच्या मूल्यांची बीजे या वर्गात रुजवणे हे त्यांचे माणूस सुरू करण्यामागे निश्चित



अनुक्रमणिका

ध्येय होते.

स्वातंत्र्य मिळूनही लोकाशाहीची मूल्ये इथे रुजवणे ही काळाची गरज होती. म्हणूनच गांधी-हत्येनंतर, कसलाही पुरावा हाताशी नसताना, नेहरू सरकारने रा. स्व. संघावर बंदी आणून लोकशाही पायदळी घातली, तेव्हा या बंदीविरुद्धच्या सत्याग्रहात भाग घेऊन माजगावकर यांनी दीर्घ कारावास पत्करला तो याच मूल्यांसाठी. पुढे इंदिरा गांधींनी आणीबाणी लादून जी लोकशाहीची थट्टा आरंभिली, तेव्हा आणीबाणी विरोधात 'माणूस'कार म्हणूनच अग्रभागी राहिले. जिथे भले भले संपादक नामोहरम झाले, तेथे माजगावकर ठामपणे झगडले.

राष्ट्रवादी शक्ती देशात कमजोर राहिल्या हेच 'फाळणी' बाबतीत हिंदूंच्या नशिबी आलेल्या ऐतिहासिक पराभवाचे मूळ सामाजिक कारण होते, हे त्यांचे या पराभवाचे अचूक विश्लेषण होते. इथे राष्ट्रवादाची भाषा होती, परंतु राष्ट्रीयत्वाने भारलेला समाज इथे निर्माण होऊ शकलेला नव्हता. भाषा आणि कृती, निष्ठा आणि व्यवहार यात मेळ नव्हता. बाका प्रसंग आल्यावर आमचे नेते, विशुद्ध राष्ट्रीय भूमिका घेऊन तत्त्वशुद्ध निर्णय घेण्यास आणि कणखर कृती करण्यास, असमर्थ ठरत होते. आणि मुख्य म्हणजे, जनताही अशा नेत्यांच्या तत्त्वभ्रष्टतेबद्दल जाब न विचारता, त्यांच्याच मागे जाण्यात धन्यता मानत होती. केवळ काँग्रेसी नेत्यांच्या बाबतीतच हे घडत होते असे नाही तर 'फाळणी'विरोधी असलेल्या व राष्ट्रवादी म्हणवणाऱ्या हिंदुत्वनिष्ठ संघटनांच्या कृतीत आणि उक्तीत तरी कुठे मेळ होता ! सामाजिक प्रवाहाशी, त्यांच्या निष्ठांचा मेळ नसल्याने, प्रवाहाला वळण देण्याची यांची शक्तीही ऐनवेळी सुप्तच राहिली. हीच दशा इथल्या साम्यवाद्यांची ! चांगला साम्यवादी हा प्रथम उत्तम राष्ट्रवादी असावा लागतो. येथे भारतीय साम्यवादी पक्ष उभा होण्याऐवजी मॉस्को वा पेकिंगची एखादी शाखाच काम करत असल्यासारखा प्रकार होता. कै. माजगावकरांनी म्हटले आहे - 'रशिया महायुद्धात दाखल झाल्यावरोबर या साम्राज्यवादी युद्धाचे लोकशाही युद्धात रूपांतर होते, या गौड बंगालाची एरवी संगतीच लावता येत नाही.'

मात्र हा राष्ट्रवाद पूर्वजांचे केवळ पोवाडे गाऊन आणि कर्णे लावून त्यांच्या जयंत्या धुमधडाक्याने साजऱ्या करून येथे प्रभावी होईल अशी त्यांची खुळचट कल्पना नव्हती. त्यांनी सांगितले आहे -

'औद्योगिक क्रांतीतून जन्माला येणारा समाजच राष्ट्रवाद समजू शकतो. राष्ट्रवाद हे आधुनिक काळातील उदयोन्मुख भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे राजकीय तत्त्वज्ञान आहे. संघर्ष खेळावे लागतात, त्यासाठी जुन्या सरंजामशाही युगातील धार्मिक व जातीय निष्ठांना मागे टाकून, शुद्ध राष्ट्रीय जाणिवा धारण करणारा नवा वर्गच समाजात प्रभावी व्हावा लागतो.'

राष्ट्राच्या सामाजिक व आर्थिक अंगाकडे समाजाचे लक्ष वेधून, त्या क्षेत्रातील विषमतेच्या निर्मूलनासाठी प्रयत्न करणे हे माजगावकरांचे १९६० मध्ये 'माणूस' सुरू करण्यामागचे इप्सित होते. सामाजिक सभ्यता, विषमतेला थारा नसणे, जाज्वल्य साहित्यप्रेम व देशप्रेम यातून समर्थ सामाजिक राष्ट्रवाद प्रगट होत असतो. दुसऱ्या महायुद्धानंतर चर्चिल यांनी पार्लमेंटमध्ये एक महत्त्वाचे वाक्य सांगितले होते. ते म्हणाले - ' The British people were the Lion, I had

the honour to roar', सामाजिक सक्षम राष्ट्रवाद कसोटीच्या प्रसंगात कसा प्रगट होतो, हे या वाक्यातून लक्षात येते.

१९७३ साली कै. बाळासाहेब देवरस यांचेकडे रा. स्व. संघाची सूत्रे आल्यानंतर, त्यांनी संघापुढे सामाजिक राष्ट्रवादाचे उद्दिष्ट प्रकर्षाने ठेवले. जातिव्यवस्था ही व्यवस्था नसून अव्यवस्था आहे. - ' It should go lock stock & barrle' असा स्पष्ट पुकारा देवरसांनी केला. आज गिरीजन, वनवासी, पारधी, रुग्णालये, शेतीप्रयोग या सर्व क्षेत्रात सामाजिक राष्ट्रवाद पसरताना दिसतो आहे. परंतु हे सर्व १९७३ नंतर घडलेले आहे. कै. माजगावकरांनी १० वर्षे अगोदर 'माणूस' सुरू करून या संबंधी वैचारिक मंथन सुरू केलेले दिसते. ... कै. माजगावकर यांना मी द्रष्टे विचारवंत मानतो व संपादक-पत्रकार म्हणून त्यांची जातकुळी टिळक-आगरकरांचीच समजतो.



माणसे जोडण्यात माजगावकर संपादक म्हणून अतिशय यशस्वी ठरले, याचे प्रमुख कारण ते पराकोटीचे निर्लोभी व प्रामाणिक होते. आर्थिक ताणांच्या काही क्षणात, त्यांच्या हातून चुका घडल्याच नाहीत असे नाही, परंतु असे प्रसंग अपवादात्मकच म्हणता येतील. मुख्य म्हणजे ज्याला त्यांनी मित्र म्हटले, त्याची साथ त्यांनी कोठल्याही परिस्थितीत सोडली नाही. वृत्तपत्र आपले हाती आहे, म्हणून त्यातून स्वत:ची प्रसिद्धी वा स्तुती घडवून न आणण्यावावत त्यांचा कटाक्ष असे. १९६९ साली पुण्यात मंडईतील गणेशमूर्तीची विटंबना झाल्याने हिंदू-मुसलमान दंगल उसळली. दुसऱ्या दिवशी दंगल निवळली व रात्री ८ वाजता कर्फ्यू उठला. माजगावकरांमधील पत्रकार - प्रत्यक्ष परिस्थिती पहायला उत्सुक झाला. रात्री ९ च्या सुमारास माझ्या स्कुटरवरून माजगावकरांसह मी बाहेर पडलो. कोणतेही कारण न देता पोलिसांनी आम्हाला बाजीराव मार्गावर पकडले व मंडईजवळच्या लॉकअपमध्ये बंद केले. तेथील कोठडीतील रात्रभराचे अनुभव कधीही न विसरणारे होते. परंतु दुसऱ्या दिवशी दुपारी ४ वाजता आम्हाला सोडले. माजगावकरांनी 'माणूस' मधून स्वत: या १६-१६ तासांच्या बेकायदा कोठडीचा गाजावाजा केला नाहीच व माझ्यासारख्याला करूही दिला नाही! कुटुंबातील कर्त्या पुरुषांची निधने झाली. त्यांच्याबद्दलच्या 'सहवेदना' वगैरे प्रसिद्धीलाही 'माणूस'मध्ये त्यांनी कधी जागा दिली नाही.



माणूस परिवारात आम्ही बरेच लेखक होतो. लेखकांना श्री.गं.चा आधार वाटे. तसाच श्री.गं.ना लेखकांविषयी लोभ होता. या संबंधात 'चित्त हवे भयशून्य' हा त्यांचा निर्माणपर्व' मधील लेख जिज्ञासूंनी अवश्य वाचावा. असे असले तरी लेखक हे आपल्याच मस्तीत वावरणारे व अतर्क्य वागणारे असल्याने, त्यांना सांभाळणे, याला कौशल्य लागे. कै. माजगावकरांपाशी ते भरपूर होते. याची एक कथा मला सांगता येईल.

विद्याधर पुंडलीक, श्री. ज. जोशी व मी अशा तिघांना 'तामिळनाडू'मध्ये धाडून,

कै. माजगावकरांनी 'माणूस' वाचकांना 'दक्षिणायन' ही लेखमाला सादर केली. लेखमाला खूप वाचली गेली. आम्ही तिघांनी ३-३ लेख लिहिले होते. रीतसर जे पैसे द्यायचे ते माजगावकरांनी आम्हाला दिले. काही दिवस गेले. मध्यंतरी विद्याधर पुंडलीक मुंबईला जाऊन आले. त्यांना तिथे 'सत्यकथा' परिवारातील खास वाचक भेटले. त्यांनी वाटतं पुंडलीकांना सांगितले की, - 'लेखमाला चांगली आहे, परंतु त्यातल्या त्यात तुमचे लेखन हे फारच चांगले आहे !' काहींचे असे मत असायलाही हरकत नाही. परंतु पुंडलीकांनी मजा उडवली. त्यांनी माजगावकरांना भेटून सांगितले - 'मुंबईला असे मत आहे, तेव्हा मला श्री.ज., वि.गं.पेक्षा जास्त पैसे तुम्ही द्यावे '. मला व श्री. जं. ना. यातले काहीच ठाऊक नव्हते. त्यावेळी बहुधा प्रत्येक रविवारी, सकाळी, पुंडलीकांकडे, माझेकडे, माजगावकरांकडे किंवा पारगावकरांकडे गप्पाष्टक झडत असे. माजगावकर व मी त्यावेळी एकाच इमारतीत राहात होतो. एका रविवारी सकाळी माझेकडे गप्पा चालू होत्या. जोशी-पुंडलीक आल्यावर माजगावकरही वर माझेकडे आले. गप्पा, खाणे, चहा झाल्यावर माजगावकरांनी शर्टाच्या वरच्या खिशातून तीन पांढरे लिफाफे काढले. पहिला पुंडलीकांना दिला. त्यानंतर मला व श्री.जं.ना देताना माजगावकर म्हणाले, 'दक्षिणायन छान जमून गेले. म्हणून तिघांचे मानधन थोडे थोडे वाढवले आहे.' प्रत्येकी ४० रुपये माजगावकरांनी आम्हाला दिले होते. हा काय प्रकार आहे कळेना ! बैठक मोडल्यावर मी माजगावकरांना विचारले. त्यांनी पुंडलीकांची गंमत सांगितली व म्हणाले - ' हे तुमच्याजवळच ठेवा '. ३०-३२ वर्षे मी हे माझ्याजवळ ठेवले, आता विद्याधर पुंडलीक, श्री. ज. अथवा माजगावकर यापैकी कोणीच उरले नाहीत. तेव्हा सांगून टाकले.



'नाझी भस्मासुराचा उदयास्त' ही माझी लेखमाला व 'माणूस' यांचे नाते सर्वांनाच ठाऊक झालेले आहे. खरं तर ही काही 'माणूस'मधील माझी पहिली लेखमाला नव्हे. 'माणूस'मध्ये सहकारी म्हणून काम करू लागताच मी १९६१ मध्येच 'रणात्रीण स्वातंत्र्य जेव्हा मिळाले' ही फाळणीवरील लेखमाला सुरू केली. या लेखमालेचे पुस्तक मी केले नाही. कारण फाळणीवर विस्तृत लिहायचे होते. हे पुस्तक 'फाळणी : युगांतापूर्वीचा काळोख' प्रसिद्ध व्हायला पुढे ३० वर्षे गेली. परंतु या पहिल्या लेखमालेने, 'माणूस' वाचला जाऊ लागला आहे, एवढे आश्वासन येणाऱ्या पत्रावरून आम्हाला लाभले. यानंतर 'मी पाहिलेला लाल हुकुमशहा' - ही मिलोवन जिलासच्या पुस्तकावरील लेखमाला झाली, मग दलाई लामाच्या पलायनावर ' ने मजसि ने परत मातृभूमीला' ही लेखमाला झाली व नंतर आता वर्ष-दीडवर्ष तरी चालेल अशी लेखमाला हवी म्हणून 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' सुरू झाली. 'राईज अँड फॉल ऑफ दी थर्ड राईश' हा पुस्तकाचा ठोकळा त्यांनीच यासाठी माझे हाती ठेवला. संपादक म्हणून माजगावकर या लेखमालेतील अक्षर नि अक्षर काळजीपूर्वक वाचत असत. संबंधित अन्य संदर्भ पुस्तके मिळवून देत असत. चर्चिलचे खंड, द गॉल चे आत्मचरित्र, टॉस्टकीचे चरित्र अशी कितीतरी पुस्तके माजगावकरांनी उपलब्ध केल्याचे स्मरते. यामुळे शिररचा हात सोडून लेखमालेचे

वेगळेपण प्रगट होऊ लागले. माजगावकर लेखनावर चर्चा करत असत. मजकूर आकर्षक पद्धतीने छापला जातो आहे हे पहात असत. नाझी लेखमालेची पहिली ५-६ प्रकरणे लिहून झाली. परंतु लेखमालेला शीर्षक सुचत नव्हते. ज्या पुस्तकाचा प्राथमिक आधार या लेखमालेला होता ते 'राईज अँड फॉल ऑफ दी थर्ड राईश' हे शिररचे पुस्तक असल्याने 'उदयास्त'हा शब्द सहज पुढे आला. परंतु तिसऱ्या राईशचा उदयास्त' वगैरे काहीतरीच वाटत होते ! मी व माजगावकर यावर पुन: पुन्हा विचार करत होतो. परंतु चांगले शीर्षक सुचत नव्हते. त्यावेळी 'तळजाई' येथे एका घरबांधणी सहकारी संस्थेचे मी व माजगावकर सभासद झालो होतो. एक दिवशी दोघे सरळ उठलो व सायंकाळी ६ वाजता तळजाईच्या पठारावर जाऊन बसलो. शीर्षकाचाच विचार करण्यासाठी. राईशऐवजी नुसते 'नाझी' म्हणावे असे माजगावकरांनी सुचविले व 'भस्मासूर' शब्द शीर्षकात ठेवून आपली भूमिका स्पष्ट करावी, असे माझ्या मनात आले. क्षणार्धात 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' हे नाव ठरवले व समाधानाने आम्ही परत आलो. अखेरच्या आजारातही एकदा श्री.ग. म्हणाले - 'तळजाईवरचा दौरा आठवतो का? आता असे वाटते की इतके सोपे शीर्षक सुचायला, आम्हाला दोघांना, इतका त्रास कसा काय घ्यावा लागला? त्रास झाला खरा, परंतु चांगले शीर्षक हाती आले. माजगावकर आपल्या लेखकांच्या मानसिक घडामोडीतही किती आत्मियतेने समरस होत असत हे यावरून लक्षात येईल. लेखकांवर आपण मदत करून उपकार करत आहोत, असे दाखवण्याची वृत्ती यामागे नसे. 'माणूस' परिवार सतत वाढता राहिला तो कै. माजगावकरांच्या अशा आस्थेमुळेच.

रचनात्मक क्रियाशीलतेची, प्रबोधनाची व संवादाची परंपरा कै. माजगावकर यांच्या निधनाने खंडित झाली आहे. बुद्धीवादी म्हणवणारी व प्रबोधनाचा हेतू असणारी काही नियतकालिके आजही आहेत. परंतु हस्तिदंती मनोऱ्यातील त्यांची बैठक व त्यांचे वैचारिक औध्यत्य त्यांना 'माणूस'ची झळाळी आणू शकणार नाही, अशी भीती वाटते. या दोन्ही गोष्टी संपादक माजगावकरांनी कटाक्षाने टाळलेल्या होत्या.

□ □

वि. ग. कानिटकर, १३६२, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

---

### म. सा. परिषद नवे आजीव सभासद

जोशी सौ. शुभांगी अशोक, पुणे
ओगले श्री. विश्वनाथ कृष्ण, पुणे
शेणई सौ. सुजाता गणेश, पुणे
हुपरीकर माया गिरीश, पुणे
आगटे इरावती शरदचंद्र, पुणे
रानडे यामिनी, पुणे
लागू वैजयंती विनायक, पुणे
देशपांडे प्रा. सौ. सीमा विवेक, पुणे
भागवत रमेश केशव, पुणे
साठे सोनाली अनिल, पुणे
कुलकर्णी नागेश पद्माकर, पुणे
दीक्षित चंद्रशेखर बाळकृष्ण, पुणे
मुथ्या सौ. हेमलता विलास, पुणे
चव्हाण सुनिल शामराव, पुणे










राागिणी पुंडलीक

# 'माणूस' म्हणून जगलेला एक माणूस



काही माणसांची मैत्री केव्हा झाली, हे काहीवेळा लक्षातच रहात नाही. त्यांच्याशी ओळख झाल्याबरोबरच ती मैत्री दृढ होऊन जाते. कारण त्यांची स्वभाववैशिष्ट्ये ही आपल्याशी चटकन् घट्टपणे जुळून जातात. अशीच मैत्री माजगावकरांची आणि पुंडलीकांची! 'माणूस'च्या जन्मापासून ते बारशापर्यंत ते थेट त्यांच्या अंतिमच्या अंकापर्यंत आमचा मैत्रीचा गाढ संबंध दृढ होत गेला. त्यामुळे कॉलनी नर्सिंगहोमजवळील माजगावकरांचे घर ते नागनाथ पाराजवळील त्यांच्या 'माणूस' कार्यालयाच्या मधल्या टप्प्यात असलेल्या आमच्या घरी माजगावकरांचं नेहेमी जाणंयेणं असे. 'माणूस'मधील कितीतरी लेखमालांच्या कल्पना आमच्या घरी गप्पांच्या ओघात ऐकायला मिळत. संपादक हा नेहेमी लेखक मित्रांच्या घोळक्यात असावा. त्या गप्पातून अनेक नवीन लेखक, त्यांचे लेखन सहकार्य मिळून नवीन उदयोन्मुख लेखक संपादकाला

मिळत जातात. दिवाळी जवळ आली तरी माजगावकर दिवाळी अंकाच्या काळजीत केव्हाही नसायचे. ते अंकासाठी मला आपोआप लेखन मिळत जातं आणि तरीही अंक वेगळा होऊन जातो. दिवाळी अंकाबाबतही आपलं देशस्थपण असतंच ! असं जरी माजगावकर म्हणत तरी त्यांच्या रोमारोमात संपादक म्हणून भिनलेला होता, हे 'माणूस' वाचल्यावर नेहेमी जाणवत राही. मी पुंडलीकांना कितीवेळा तरी म्हणायचे, ''या वेळचा 'माणूस'चा अंक काहीतरी वेगळेपणा देऊन जातो !'' तर पुंडलीक लागलीच म्हणायचे, ''खरोखरीच आमचा हा मित्र, संपादक म्हणूनच जन्माला आला आहे !''

दरवर्षी २६ जानेवारी येतो आणि जातो. पण १९६८ साली माजगावकरांच्या मनात 'कैलास ते सिंधुसागर' ही कल्पना रूजली. या कल्पनेचा पहिला दिवस कैलास लेण्यात जाऊन त्यांनी गाजवला. 'आपण नुसतेच स्वतंत्र झालो आहोत. आता आपण यापुढे स्वयंपूर्ण होऊन स्वातंत्र्याचे स्वदेशीकरण करू या.' ही यामागची कल्पना. ही अन्नस्वातंत्रता संचालनाची कल्पना त्यांनी नोव्हेंबरमध्ये गप्पांच्या ओघात त्यांच्या मित्रवर्यांना सांगितली. दर रविवारी हे मित्र कधी आमच्याकडे कधी कानिटकरांकडे तीन-तीन तास जमत असत. त्यात या कल्पनेला सर्व मित्रांचा सर्वत्र पाठिंबा होता असे नव्हे, त्या कल्पनेच्या नेमक्या रूपरेषेबद्दलही सर्व लेखक-मित्रांना अनेक शंका होत्या. पण या संचलनामागचे माजगावकरांचे नैतिक आवाहन - शुद्ध आणि सरळ होते. अशा नैतिक आवाहनाला कुणाच्या तरी सूराची आवश्यकता होती. स्वातंत्र्य मिळवूनही वीस वर्षे झाली तरी राष्ट्रवाद? नेतृत्व? आर्थिक प्रगति? सार्वजनिक चारित्र्य? राजकारणातील नैतिकमूल्यांची जपणूक? थोडासा त्यावेळी डोकावू पाहणारा भ्रष्टाचार? अशा अनेक प्रश्नचिन्हांच्या गराड्यात त्यावेळचे बुद्धिवादी विचारवंत होते. याचं पुढे काय होणार? अशा अनेक प्रश्नचिन्हांच्या अंधाऱ्या सावल्या, वैफल्य त्यावेळच्या सामान्य माणसापुढे उभे होते. अशा वेळी एखादा माणूस किंचित का होईना बदल, एखादा वेगळा सूर, वेगळी भाषा घेऊन आवाज का उठवू शकत नाही? अशीही त्यावेळची परिस्थिती होती.

आणि नेमक्या याच वेळी माजगावकरांनी हा सूर पकडला. हा सूर खरं म्हणजे एखाद्या प्रचंड गलक्यात एखाद्या लहान मुलाच्या सूरासारखाच अति लहान होता. पण वेगळा होता ! सच्चा होता ! त्यातून माजगावकरांना व्यक्तिशः तर काहीच मिळणार नव्हतं. यात उलट माजगावकरांना काहीही फायदा न मिळता आर्थिक तोटाच सोसावा लागला असेल. पण एखाद्या खारुताईची ही इवलीशी, राष्ट्राला मदत होती ! या कार्याला मदत म्हणून कितीतरी शेतकरी ग्रामस्थांनी आपल्या छोट्या छोट्या जाहिराती 'माणूस'कडे दिल्या होत्या. त्यावेळच्या कैलास लेण्यातील आपल्या चार ओळींच्या कळकळीच्या भाषणात ते म्हणाले होते - 'यापुढे आर्थिक, सामाजिक व नैतिक यापैकी कोणत्याही भूमिकेवरून फुकटच्या मिळणाऱ्या अन्नमदतींचा आपण स्वीकार करणे असमर्थनीय आहे. जो देश अन्नासारख्या प्राथमिक गरजेबाबत दुसऱ्यांवर विसंबून असतो, त्याच्या राष्ट्रीय गर्जनांनाही काही अर्थ नसतो.' या भाषणामागे माजगावकरांची सुजाण श्रद्धा होती. इथेच कदाचित 'ग्रामायन'चं छोटंसं बीज पेरलं गेलं असणार !

८५ साली 'माणूस'चा पंचवीसावा वाढदिवस अशाच त्यांच्या वेगवेगळ्या कल्पनेतून











साजरा झाला. आमच्याकडे जाता-येता माजगावकरांनी आमच्या मोनिकाची सतार ऐकलेली. ते स्मरून तिच्या सतारीनेच त्या दिवशीच्या कार्यक्रमाची सुरुवात झाली आणि नंतर 'ध्येयवादी वृत्तपत्राचे भवितव्य' यावर परिसंवाद झाला. त्यात अनेकांनी माजगावकर व 'माणूस' यावर विचार मांडले - 'माणूस'मध्ये वैचारिक सहिष्णुता असल्याने लेखकांवर किंवा लेखनावर बंधनकारक नाही.' 'संपादक म्हणून माजगावकर वेगळे आहेत.' - संपादक लेखकाला कसा घडवतो - त्याच्या संपादनात मार्गदर्शन असते पण ढवळाढवळ नसते - संपादक हा वाचक व लेखक यातला दुवा आहे -' 'माणूस' हे वैचारिक व्यासपीठ आहे, म्हणून 'माणूस' चालवणं ही समाजाची गरज होती -'

'माणूस' चालवताना खरं म्हणजे माजगावकरांनी व्यवहार बाजूला ठेऊन ध्येयवाद बाळगला होता. अशी ध्येयवादी माणसं समाजात फार थोडी असतात. माजगावकरांनी साधी राहणी आणि उच्च विचारसरणी हे वचन प्रत्यक्षात अंमलात आणून पैशाचा हावरेपणा दृष्टीसमोर कधी ठेवला नाही. पण 'माणूस'ला होणाऱ्या तोट्याचा व्यवहारी दृष्टिकोन ठेवायला मात्र ते विसरले. निवडणुका आल्या, आणीबाणी आली, महाराष्ट्रात किंवा देशात अन्य कुठलंतरी वादळ घोंगावलं की 'माणूस'चे अंकही वेगवेगळ्या किंवा त्या त्या क्षेत्रातील मंडळींच्या मुलाखती घेऊन वेगळ्या तऱ्हेने सजत. आमच्यासारख्या मिरपुड्या वाचकांना असे अनेक प्रगल्भ विचार मांडून एखादं छोटंसं मतही बनवता येई. असे अंक निघाले की माजगावकर घरी जाताजाता स्वत: तो अंक घेऊन येत आणि आपल्या मित्राला सुहास्य मुद्रेने भेट देत. त्यावरच्या प्रतिक्रिया एक सामान्य वाचक म्हणून मीही आवर्जून देई. मी त्यावर त्यांना म्हणे - 'तुमचा 'माणूस' वाचला ना, की राजकारणातले महाराष्ट्रभराचे विचारवादळ आम्हाला थोडक्या वाचनात 'माणूस'मधून कळते. 'माणूस' बंद झाल्यावर मला या दृष्टीने आमच्यासारख्या वाचकांची फार मोठी हानी झाल्यासारखं वाटलं. मग माजगावकरांना संपादक म्हणून पोकळी, उत्पन्न झाल्यासारखी वाटली असणारच !

'माणूस'मधील विचार मध्यमवर्गासाठी आणि व्यासपीठ शेतकऱ्यांसाठी असे. माजगावकरांनी 'माणूस'मधून अनेक तरुण लेखक शोधून 'माणूस'चं व्यासपीठ उंच केलं - विस्तारलंही. यातूनच त्यांना पुढे 'ग्रामायन'ची कल्पना सुचली असावी. त्यांच्या या कार्याला त्यावेळची तरुण पिढी राष्ट्रप्रेमाची कळकळ ठेऊन, आपला भरपूर आर्थिक सुबत्ता देणारा मार्ग नाकारून 'ग्रामायन'कडे वळली. त्यात अनिल काळे, प्रभुणे, सतीश कामत, विनय सहस्रबुद्धे, विनय हर्डीकर, शिरीष सहस्रबुद्धे अशी अनेक तरुण मंडळी माजगावकरांच्या ध्येयाने प्रेरित होऊन एक ध्येयनिष्ठ मार्ग स्वीकारून त्यांच्यामागे आजपर्यंत उभी राहिली आणि लेखक म्हणूनही नावारूपास आली. 'माणूस'मधला एकमेकांच्या चर्चेतून येणारा मोकळेपणा माजगावकरांनी 'ग्रामायन'मध्येही दाखवला. ग्रामीण भागात प्रत्यक्ष जाऊन, झीज सोसून, त्रास सोसून माजगावकरांनी अनेक संकटांना तोंड देत खेड्यातील लोकांचे प्रश्न सोडवले. हे काम करताना ते तरुणांशी तरुण होऊन वागले. पण तरुणांना कधी यांनी उपदेशाचे डोस पाजले नाहीत. त्यांना यावर एकदा विचारल्यावर ते म्हणाले होते, 'तरुणांच्यात राहतो, त्यांच्यात गप्पा मारतो, मी

'माणूस'मधून लिहवून घेतली. 'द्रविड मुन्नेत्र कळघम' याचं नाव वाहेरच्या जगात माहीत नसताना हा एक ब्राह्मणेतर पक्ष आहे म्हणजे एका दृष्टीने हा नकारात्मक कार्य करणारा तामिळनाडूसारख्या प्रांतातला हा पक्ष त्याने काँग्रेसमधील भारतीय पक्षाचा चेंदामेंदा करून कामराज आणि सुब्रह्मण्यमसारख्या रथीमहारथींचा पराभव करून त्यांना भुईसपाट केले. या पक्षस्थापनेने या पक्षाची विचारसरणी मद्रदेशीय समाजजीवनात खोल रुजलेली आहे. पुंडलीकांचा समाजशास्त्राचा अभ्यास असल्याने त्या दृष्टीकोनातून तेथील त्या पक्षाचा आणि तेथील वैचारिक बदलाचा अभ्यास आपल्या या 'माणूस'मधून वाचकांना सांगता येईल आणि आपल्या महाराष्ट्रातील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद याचाही तुलनात्मक अभ्यास करता येईल, असं त्यांना वाटलं.

पुंडलीकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या अनेक मित्रांची आमच्या घरची ये-जा थांवली. पण माजगावकर मात्र माझी आस्थेने चौकशी करत, पूर्वीसारखेच येत असत. आणि त्यांच्याशी माझ्या पुंडलीकांवद्दल गप्पा होत असत. माझ्या 'साथसंगत' च्या मनोगतात सांगितल्याप्रमाणे त्यांनी मला लिहितं केलं आणि मी जे लेखन केलं ते त्यांनी जसेच्या तसे काहीही बदल न करता दिवाळी अंकाच्या मर्यादा न घालता छापलं. आज त्यांच्यावर मी हे लेखन करू शकले हे सुद्धा मला वाटतंय त्यांच्यामुळेच. कारण माझं अगदी पहिलं लेखन करवून घेण्यात आणि पुढे मला तोडकं-मोडकं लेखन करत राहण्याचा आत्मविश्वास देण्यातही त्यांचाच सर्वस्वी वाटा आहे. म्हणून त्यांना ही श्रद्धांजली वाहताना, हा लेखनाचाच आधार घ्यावासा वाटला. तो त्यांच्यावद्दलच्या या भावनेपोटीच !

□□

रागिणी पुंडलीक, १४५६ सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

---

## म. सा. परिषद नवे आजीव सभासद

सरदेसाई सौ. वसुधा विद्याधर, पुणे
किणीकर अनिल रघुनाथ, पुणे
आठल्ये अनिल त्र्यंबक, पुणे
जोग कल्पना प्रकाश, पुणे
साठे सौ. वासंती यशवंत, पुणे
राजे सौ. स्मिता सुरेश, पुणे
जोशी श्रीमती जयश्री प्रमोद, पुणे
डॉ. कमलेश, पुणे
कुलकर्णी अश्विनी अनिल, पुणे
गोगटे सौ. शुभदा शरदचंद्र, पुणे
महाजन वसंत विष्णू, पुणे
पोतदार सौ. माधवी विलास, पुणे
जोशी सौ. सुहासिनी नरेश, पुणे
वैद्य सौ. प्रीती मकरंद, पुणे
टिळे श्री. राजेंद्र पांडुरंग, शिराळा
टिळे प्रा. शैलजा पांडुरंग, शिराळा
फडके अच्युत गणेश, मुंवई
भागवत मधुकर नारायण, डोंबिवली
मोरे भगवान ज्ञानू, इस्लामपूर
देशपांडे जयंत दत्तात्रय, डोंबिवली
जोशी रवींद्र राजाराम, डोंबिवली
शेंडे ज्ञानेश्वर शांताराम, धुळे
वाणी वसंतराव एन्., धुळे
वाणी नवीनचंद्र के., धुळे

डॉ. मंदा खांडगे

# कवीच्या गावा जावे
# बा. भ. बोरकर



बाकीबाब, तुमच्या गोव्याच्या यक्षभूमीत पाऊल ठेवलं ते तुमच्या कवितेवरील प्रेमापोटी. बघताक्षणीच प्रेमात पडावं अशी ही तुमची जन्मभूमी. निसर्गाने समृद्ध असलेली. वनराईंची मानवंदना स्वीकारत, फेसाळत्या समुद्राचं विलसित निरखित गोयंकरांच्या भूमीत प्रवेश केला आणि या भूमीच्या, या निसर्गाच्या ओढीने इतक्या दूरवर आलोय याची पदोपदी जाणीव होऊ लागली. सह्याद्री आणि अरबी समुद्र यांच्या दरम्यान वसलेल्या या गोव्यात तांबडमाती आणि हिरवी वनश्री, अनेक जलप्रवाह, दुधसागर, हरवळसारखे नयनमनोहर धबधबे, माडांच्या झावळ्यातून वाळूवर अलगद झिरपणारी रांगोळी, सांध्यसमयी घराकडे परतणारी होडकी आणि हलकेच ऐकू येणारे कांताराचे आर्त सूर, पांढऱ्याशुभ्र पुळणी, गाज देणारा समुद्र, वर निळभोर

**कवीच्या गावा जावे** — या लेखमालेतील खालील पाच लेख यापूर्वी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकात प्रसिद्ध झाले आहेत.

बालकवींच्या गावी : एप्रिल-जून-९३
पद्माताईंच्या गावी : जुलै-सप्टें ९३
ग. ह. पाटील यांच्या गावी : ऑक्टो-डिसें ९३
केशवसुतांच्या गावी : जाने.-मार्च ९४
वहिणावाईंच्या गावी : जाने.-मार्च ९५

या अंकात हा सहावा लेख प्रसिद्ध होत आहे.

ही सारी गावं पहात असताना एक गोष्ट लक्षात आली की, हा निसर्ग निर्वाज्य मनोहर आहे. मनाला खुलविणारा, रिझवणारा निर्मळ असा प्रियसखा आहे. त्याच्या सान्निध्यात आपण मोकळा श्वास भरभरून घेतला तर मन आभाळाएवढं मोठं होत जातं. आणि आपोआप आपण आपले मोकळे होत जातो. या प्रवासात तुम्हाला मदतीचे हात पुढे येतात. तुमचा इच्छित संकल्प पार पाडण्यासाठी ते साथ देतात. त्यांच्यात-तुमच्यात अतूट असे निर्मळ स्नेहाचे धागे जुळून येतात. हा प्रवास असाच चालणार आहे. या प्रवासातच असा आनंद आहे. त्या त्या कवीचं गाव पाहताना तिथल्या निसर्गाची त्याच्या वास्तव्यानं पुनित झालेल्या तिथल्या मातीची ओढ फक्त त्यालाच समजेल, ज्याचं मन 'कवीचं मन' आहे.

— डॉ. मंदा खांडगे

आकाश आणि क्षितीजाच्या कडेला भिडलेली समुद्ररेखा उन्हात झगमगते तेव्हा भासतंय की चांदीच्या राशीच्या राशी या इथे ओतल्या जाताहेत. किनाऱ्यावर दाट वनात माड डुलताहेत. माडांच्या राजवर्खी झावळ्या जणू छत्रचामरं डोक्यावर धरताहेत. या माडांच्या बनातून वारा वहायला लागला की ऐकू येणारे संगीत ऐकावं ते येथेच. हा निसर्ग असा ओसंडून वाहणारा. मांगल्य आणि पावित्र्य जिथे एकवटलं आहे अशी शांतादुर्गा, मंगेश, म्हाळसा, महालक्ष्मीची स्वच्छ सुंदर देवळं आणि उत्तुंग चर्चच्या इमारती. इथला निसर्ग सुंदर आहे. सौंदर्याचे एक अभिजात दर्शन आहे. हा निसर्ग सर्वसामान्यांच्याही मनात एक मांगल्याची, पावित्र्याची भावना निर्माण करतो. मग बा. भ. बोरकरांसारखा सरस्वतीचा उपासक या निसर्गाची पूजा बांधणारच.

*' कमलाक्ष डोंगरावर कनकाची जाळी*
*नदि नागकातशी जयास वळसा घाली*
*सखलात ठेंगणी झुडपे झाडे जाळ्या*
*ध्यानस्थ जणू ली ससे अस्वले जाळ्या*

'पूजा' या 'अनुरागिणी'मधील कवितेत पुढे बा. भ. बोरकर लिहितात,

*ढग ऐरावतसे शुभ्र डोंगरामागे*
*त्यातून शुभंकर दिव्य सुदर्शन जागे*
*फाकून पाख, कृष्णकमळ पंखांची*
*दीप्तीत धूपसा भूप उलगडू लागे'*

*एक सुंदर, मंगल चित्र डोळ्यापुढे येत असतानाच*

*'जोडून ओंजळी उभी तृणाची पाती*
*पानात उगवल्या गंधांच्या फुलवाती*
*ही पूजामग्ना प्राप्त स्नात प्रसन्ना*
*जणु ओलेत्याने मंत्र पुटपुटे माती'*

असं अनुपमेय वर्णन आलं तेव्हा जाणवलं की बा. भं. च्या प्रतिभेवर इथल्या निसर्गाचे संस्कार झाले आहेत. मात्र तिचे व्यक्तित्त्व स्वतंत्र आहे. निसर्गविषयक कविता लिहिताना बाकीबाब स्वत:शी प्रामाणिक राहिले होते. त्यांच्या कविदृष्टीला निसर्गातले दृश्य जसे दिसले तसेच त्यांच्या कवितेत ते साकारलेय. कवितेतून त्यांचे जीवनच प्रतिबिंबीत झाले आहे. मायभूमीवरील प्रेमाच्या धुंदीत त्यांनी 'माझ्या गोव्याच्या भूमीत' या आपल्या भूमीच्या अमर प्रेमाच्या ओव्या गायल्या. रंग, रूप, गंध अवघं वस्तुजात या कवितेत सुस्नात झालंय.

*माझ्या गोव्याच्या भूमीत*
*गड्या नारळ मधाचे*
*कड्याकपारी मधोनी*
*घट फुटती दुधाचे*

या कडव्यातल्या उपमाही लाजवाब. दुसऱ्या उपमाच इथे चपखल बसणार नाहीत. अशा या गोव्याच्या भूमीतील बाकीबाब यांचं गाव बोरी आणि आजोळ कुडचडं पहायचं होतं. बोरीला असताना तासन् तास बोरकर जुवारीचं पाणी पाहत राहत. असं मंत्रमुग्ध करणाऱ्या जुवारीचं दर्शन घ्यायचं होतं.

पुण्याहून निघताना बा.भं.च्या कन्या पद्माताई वक्रम आणि जामात, यांनी बोरी आणि कुडचड्याची माहिती पुरवली होती. पोरवरीमला बोरकरांच्या कन्या लता कामत आणि जामात श्रीराम कामत राहतात. त्यांचा पत्ता आणि फोन नंबर त्यांनी दिला होता. मी म्हापशाला उतरले होते. तेथूनच श्रीराम कामतांना फोन केला. त्यांनी पोरवरीमला ते रहात असलेल्या मणेरकर फ्लॅटस्मध्ये कसे यायचे याच्या खाणाखुणा सांगितल्या. त्याप्रमाणे अगदी लवकर उठून उजाडताच मी आणि माझी मैत्रिण कुमुद पोरवरीमला जायलो निघालो. मांडवी नदीच्या पलीकडे पोरवरीम्. खाजगी बसमधून आम्ही निघालो. प्रत्येक प्रवासात निसर्ग खुणावत होता. लाल चुटुक रस्ते, हिरवीगार वनश्री. दिवस थंडीचे. पण इथल्या थंडीत उबदारपणाही होता. सृष्टीच्या ऋतुचक्राच्या बदलातील नोंद निसर्गातच पहायला मिळते. पानगळीनंतर झाडाला फुटलेली नवेली सतेज पालवी, अंगाखांद्यावर मोहरून आलेले आंबे, काजू, फणस, धुंद दरवळाचे दिवस. बस मांडवीच्या पुलावरून चालली होती. अगदी तरुण वयात बा.भं. नी मातृभूमीची भूपाळी गाताना,











*मांडवी जुवारि जलवंतीचे पदी तुझ्या पैंजण*
*साजरे पदी तुझ्या पैंजण*

असे मांडवी, जुवारि या नद्यांचे वर्णन केले होते. ती मांडवी प्रत्यक्ष पहायला मिळाली. म्हापशाला उतरलो असल्याने आता गोव्याच्या मुक्कामात मांडवीवरून वरेचदा जा-ये करायला मिळणार याचा आनंद झाला. मांडवीचं नुसतं दर्शनही सुखावह होतं. पुलावरून मांडवीचं संथपणे वाहणारं पाणी झिरमिरत होतं. उतारावरून वस वेगाने धावत होती. पोरवरीमृचा थांवा आल्यावर उतरलो. नदीच्या पलीकडे पोरवरीम् आहे आणि मणेरकर फ्लॅटकडे जाताना कवी वोरकरांचे नाव ज्या रस्त्याला दिलेय त्या रस्त्याने वळा असं कामतांनी सांगितलं होतं. वरीच शोधाशोध केली पण कवी वा. भ. वोरकर रस्त्याची पाटी काही सापडेना. वरंच हिंडत राहिलो. छोटे-छोटे बंगले, दुमजली घरं, प्रत्येक घरापुढे तुळशीवृंदावन, दारात वहरलेली शोभेची झाडं, मन वेधून घेत असताना डोळे वा. भ. वोरकर रस्त्याची पाटी शोधत होते. वा. भं.चं आठवीनंतरचं शिक्षण या पोरवरीम्‌मध्येच झालं. इथे राहणारे त्यांचे चुलत चुलते वैद्यकीय व्यवसाय करीत होते. इथल्या शाळेत शिकत असतानाच कुमार वयातील वोरकरांना काव्यात्म दृष्टी दिली ती त्यांच्यावरोवर शिकत असलेल्या मार्गारिदने. आणि मग त्यांना सारी सृष्टीच काव्यात्म आणि काव्यमय भासू लागली.

*त्या रात्रीचे तसे चांदणे जगी न पडले कधी*
*तशी न उरली पुन्हा कधीही दुथडी जागी नदी*
*उरात घुसुनी गळ्यात घुमली निळी निळी कोकिळा*
*असे झाकुनी डोळे जेव्हा तिने चुंबिले मला*

प्रणयाची ऊर्मी आणि प्रीतिभावनेचं उत्कट चित्रण करणाऱ्या अशा अनेक कविता नंतर बाकीबाबनी लिहिल्या. त्यांच्या कवितांचा अधिकांश भाग प्रेम भावनेने व्यापलेला आहे. प्रेम हा त्यांच्या कवितेचा स्थायीभाव असला तरी प्रणयविषयक त्यांच्या कवितेत निसर्गसुद्धा एक वेगळीच छटा उमटवून जातो. वा. भं.च्या या अशा कविता डोळ्यांपुढे येऊ लागल्या पण त्यांच्या नावाची पाटी काही सापडेना. अगदी सकाळची वेळ असल्याने रस्त्यावरही कोणी दिसेना. थोडं पुढं गेल्यावर एक गृहस्थ गाडी सुरू करत होते, त्यांना कामतांचा पत्ता विचारला. त्यांनी सांगितलं त्याप्रमाणे गेल्यावर बा. भं. बोरकर रस्त्याची पाटी लागलीच दिसली. त्या रस्त्याने सरळ गेल्यावर थोडं चालल्यावर मणेरकर फ्लॅटस्‌ची बिल्डिंग उजव्या हातालाच होती. श्री. श्रीराम कामत वाटच पहात होते. चहा-पाणी होईपर्यंत कामतांनी आधी बोरीला आणि नंतर कुडचड्याला कसं जायचं याचा पत्ता दिला. लताताईंनी बाकीबाब शेजारीच रहात होते ते त्यांचे घर उघडून दाखवले.

'माझ्या गोव्याच्या भूमीत
*सारा माझा जीव जडे*
*पुरा माझ्या कवनांचा*
*गंध तेथे उलगडे'*

असा आपल्या मायभूमीवर जीव जडवलेल्या त्या महाकवीच्या वास्तूला आदरपूर्वक हात जोडले. या वास्तूत बोरकरांचे सर्व साहित्य ठेवले आहे. ज्यांना त्यांच्या साहित्यावर अभ्यास करायचा आहे, त्यांच्यासाठी हे सर्व साहित्य उपयोगी पडेल. तिथे राहून त्यांचा अभ्यास करता येईल अशी सोयही आहे.

श्रीराम कामतांनी अल्पशा भेटीत माहिती पुरवली होती. बोरकरांचे मामा स्टेशनमास्तर होते. दिसायला मंडळी देखणी. नारळाच्या बागा आहेत आणि त्यांची शेतीही आहे. बोरकरांचे वडील पेंटिंग करायचे. शेतीही करायचे. बाशिंगं, मखर बनवायचे. पोलीसपाटीलकी करायचे. भाट म्हणजे नारळी-सुपारीच्या बागा. म्हणून भाटकर म्हणायचे. बोरकरांना चार भाऊ आणि दोन बहिणी. एक भाऊ सिनेमा इंडस्ट्रीमध्ये आणि एक भाऊ टेलिकम्यूनिकेशनमध्ये होता. एक बहीण पणजीत असते. त्यांचं नाव हिराबाई. बोरकरांची आई दिसायला अतिशय देखणी. बोरकर सावळ्या रंगाचे पण तरतरीत, सतेज, फारसे उंच नव्हते, अंगाने सडसडीत, दाट वाढलेल्या केसांची कपाळावर आलेली झुलपे, मुद्रेवर स्मितभाव. गायचेही तल्लीन होऊन. बा. भं.चं गाणं म्हटल्यावर त्यांच्या 'पायंजणां' या कोंकणी काव्यसंग्रहातल्या ओळी स्मरल्या. ज्या ओळींनी मला सतत भुरळ घातलीय. त्यातली लाघवी कोंकणी बोली मनाला नितळसा स्पर्श करते. सगळे शब्द समजले नाही तरी त्यातले भाव मनाला थेट जाऊन भिडतात.

*त्या दिसा वडाकडेन गडद तिनसजनां*
*मंद मंद वाजत आयली तुजिं गो पायंजणां*
*फुलल्यो वैर चंद्रज्योती*
*रंध्रांनी लागल्यो वाती*
*गळ्यां सुखां दोळ्या दुखां*
*लकलकली जावन थिकां*
*नकळटना एक जाली आमि दोंगाय जाणा*
*तांतले काय नुळ्ळे आज*
*सगल्या जिणे आयल्या सांज*
*तरीय अकस्मात तुजी वाजति पायंजणां*

तिन्हीसांजेच्या वेळी शेताच्या कडेला असलल्या वडाखाली उभे राहून जन्मजन्मांतरीच्या आपल्या प्रेयसीची प्रतीक्षा करीत आहोत. ती खात्रीने येणार आहे, असे त्याला वाटते. पण तिन्हीसांजेच्या धूसरतेत ती दिसत नाही. पण तिच्या पायातल्या पैंजणांचा नाद, त्याची लयबद्ध छुन्छुन् त्याला ऐकू येते. कवीची चित्तवृत्ती निसर्गाशी तादात्म्य पावते आणि तो गुणगुणू लागतो, 'मंद मंद वाजत आयली तुजि गो पायंजणां' ज्यांनी या कविता बाकीबाबच्या तोंडून ऐकल्या ते सांगतात, बाकीबाब गाताना बेहोष होऊन या कविता गात. खास बोरकरी ढंगाच्या अशा कितीतरी कविता 'पायंजणां'मध्ये आहेत. त्या मनामध्ये रुंजी घालू लागल्या. पण आता डोळ्यांपुढे होता पोरवरीमवरून परत पणजीचा प्रवास. चालत बसथांब्यापर्यंत जायला १०-१५ मिनिटे लागली. पोरवरीमहून मांडवी संथपणे वाहत होती. मांडवीचा जलाशय न्याहाळणं हा

आता एक मला चाळाच होऊन गेला.

*ओंकाराचा आवाज पहिला*
*सदा जागवत राही सागर*
*श्री गिरीजेचे पदन्यासही*
*होऊन येती रतन अबोली*
*तीच काय प्रकटली मांडवी*

वा. भं.नी किती सुंदर वर्णन मांडवीचं केलंय.

बसने पणजीला पोहोचलो. घड्याळाचा काटा दहाचा आकडा दाखवत होता. कामतांनी सांगितल्याप्रमाणे पणजीहून व्हाया फोंडा बस पकडून प्रथम बोरीला जायचं होतं. साईबाबा मंदिराचा थांबा विचारून तिथे उतरा. तिथून जवळच बोरकरांचं घर आहे. सगळं व्यवस्थित लिहून घेतलं होतं.

कविराजांच्या गावी आलो. साईबाबांचं देऊळ ही खूण होती. त्या थांब्यावरच उतरलो. दुतर्फा असलेल्या झाडांमुळे त्या लांबलचक रस्त्यावरही छान सावली धरली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूला घरं दिसत होती. साधारण सारखीच वाटत होती. घरांना तिन्ही बाजूंनी बाहेरून व्हरांडा. काहींना फक्त पुढून. अंगणात झाडं. बहुतेक घरातल्या अंगणात तुळशीवृंदावन दिसत होतं. इथली तुळशीवृंदावनं अतिशय सुंदर-सुबक. त्यात डोलणारी कृष्णतुळस. एखादं तुळशीवृंदावन इथून घरी न्यावं असा मोहही झाला. वाटेत एकजणाला बोरकरांच्या घराचा पत्ता विचारला. आम्ही उभे होतो तिथून अवघं तिसरं घरं बोरकरांचं. फाटक उघडून आत गेलो. अंगणातून घरात जाताना रुंद अशा खूप पायऱ्या. अंगण चांगलं ऐसपैस. अंगणात झाडंही खूप. त्याची शीतल सावली साऱ्या अंगणभर पसरली होती. उन्ह आता चढायला लागलं होतं, तरी जाणवत नव्हतं. एकतर दिवस थंडीचे. त्यामुळे प्रवास सारा सुखकर होत होता. पायऱ्या चढून गेल्यावर जाणवलं की एवढ्या पायऱ्या असल्यामुळे घर रस्त्यापासून खूपच उंचावर दिसतंय. वेल दाबल्यावर गाउनमध्ये असलेल्या एका वयस्कर बाईंनी दरवाजा उघडला. आम्ही कोण म्हणून चौकशी केली. मी माझी व कुमुदची ओळख करून दिली. येण्याचं कारण सांगितलं. त्यांनी आम्हाला आत या सांगितलं. वृद्धत्वाकडे झुकलेल्या बारीक चणीच्या त्या बाईंनी आम्हाला बसायला सांगितलं. पॅसेजमधून आम्ही आत गेलो. बोरकरांच्या वहिनी एकट्याच या घरात राहतात, अशी माहिती मिळाली होती. आम्ही त्या येण्याची वाट पहात होतो. एवढ्यात मघाशी दार उघडायला आल्या त्याच बाई हातात पाण्याचा तांब्या घेऊन आल्या. 'मी बोरकरांची धाकटी वहिनी' त्यांनी स्वत:चीच ओळख करून दिली. तेव्हा मी पहातच राहिले. केसांचा अंबाडा, नऊवार साडी नेसत असलेल्या अशी काहीतरी कल्पना मी या वहिनींविषयी केली होती. मग माझ्या लक्षात आलं वार्धक्याने साडीचा भार पेलवत नसणार म्हणून त्यांनी सुटसुटीत गाऊन घातला असावा.

बोरकरांचं मूळ आडनाव वर्दे. पण बोरीला स्थायिक झाले म्हणून बोरकर. बोरी गाव तसा सुंदर, निसर्गरम्य. हे सांगायला नकोच. कारण हे गाव निसर्गाची पूजा बांधणाऱ्या कविवर्य

बोरकरांचं गाव आहे. नदीच्या काठावरील शेतांपलीकडे टुमदार गाव. वस्ती फार नाही. मुख्य रस्ता लांबसडक. गावात नारायणाचं देऊळ. आता साईबाबांचं नव्यानी झालंय. अजूनही काम चालूच आहे. पुढनं घरं दिसतात, पाठीमागे डोंगर. त्यावर दाट झाडी. गावात सदैव हिरवीगार दिसणारी कुळागारं आहेत. अशा या रमणीय गावात बोरकरांचं बालपण गेलं. निसर्गाच्या बाबतीत समृद्ध असलेलं बोरी गाव शिक्षणाच्या बाबतीत मात्र मागे होतं. एकूण गोमंतकातच त्या काळात मराठी शिक्षणाची पिछेहाट झाली होती. गोव्यावर पोर्तुगीजांचं राज्य होतं आणि त्यांनी तर मराठीसंस्कृती नष्ट करण्याचा चंग बांधला होता. मराठी ही गोव्याची संस्कारभाषा आहे. गोमंतकियांच्या मनाचा पिंड मराठीवर पोसलेला आहे. पारतंत्र्याच्या काळात राजभाषा नसतानाही मराठी भाषेबद्दलचं प्रेम येथील रहिवाशांच्या मनात ओतप्रोत भरलेलं होतं बोरीत शाळा अशी नव्हतीच. मालवण वगैरे भागातून शिक्षक इथे येऊन राहात. भाटकराच्या वऱ्हांड्यात एकशिक्षकी शाळा भरत असे. दूरवरून चालत येऊन मुलं इथे येऊन शिकत. चार आणे फी असे. गावातली सर्व थरातली मुलं इथे शिकत. भाटकर वर्षाला तीन जोड आणि २५ रुपये या शिक्षकाला देत. अशा रीतीने या समाजाने मराठी शिक्षण परंपरा टिकवली.

बोरकरांना निसर्ग फार आवडायचा. हळव्या मनाचे बोरकर तासन्तास नदीचं पाणी पहात बसायचे. ते नवव्या वर्षी कविता पाठ म्हणत. बोरकरांच्या घरातील वडीलधारी मंडळी सोज्ज्वळ, प्रेमळ, बाळबोध वळणाची. सकाळी घरात भूपाळी-स्तोत्रं म्हटलं जायची. रात्र झाली की समईच्या मंद प्रकाशात घरातली मोठी मंडळी आणि मुलं भजन करीत. पौराणिक ग्रंथांचं वाचन घरात होई. घरातील वडीलमंडळींना ज्ञानेश्वरीतील ओव्या मुखोद्गत होत्या. बोरकरांनी 'गीतार'च्या प्रस्तावनेत लिहिलंय त्यातून थोडक्यात त्यांचं बालपणीचं जीवन, घरातील वातावरण याच्यावर प्रकाश पडतो. त्यांच्याच शब्दात सांगायचे तर 'शब्दांचं माझं वेड अगदी लहानपणापासूनच. लोलकांप्रमाणे मी ते खेळवीत बसायचा आणि तालासुरात घोळवत रहायचा. माझे वडील फुरसतीच्या वेळी भिंतीवर चित्रे काढीत ते मी तासन् तास टक लावून पाहे. त्यांची पाठ फिरली की, फडताळातल्या त्यांच्या रंगांच्या पुड्या उघडून समोर मांडत असे. तांबडा, निळा, सोनवखी रंग मला भुरळ घालीत. रंगांप्रमाणे मला स्वराचेही वेड होते. माझे थोरले मामा पट्टीचे गाणारे. आवाज पल्लेदार, वझेबुवांची त्यांच्यावर विशेष मर्जी. केशवराव व बालगंधर्वांची पदे सहीसही म्हणत. मला गळा चांगला व लवकर पाठ होई. चुलतकाकांच्या घरच्यांनी व माझ्या घरच्यांनी माझे पाठांतर घटवून घेतलं होतं. आमचा पात्रीस भंडारी देखील आपली कोंकणी गीते माझ्याकडून म्हणून घ्यायचा. माझ्या लहानपणीचे ते जग अष्टौप्रहर आणि बाराही मास कवितेने गजबजलेले असे. घरातली, व्यवहारातली भाषा कोंकणी. त्यामुळे आरंभी झालेल्या पाठांतराचा अर्थ नीट कळत नसे. आठ-नऊ वर्षांचा असताना काकांबरोबर किरिस्ताव भंडाऱ्याच्या लग्नाला गेलो. लोकांच्या आग्रहामुळे, तिथल्या तिथे कटाव रचून आमच्या पात्रीस भंडाऱ्याने आपल्या शीघ्रकवितेचा नमुना दाखवला. मनात आलं, आपणही पात्रीसप्रमाणे कविता करावी. नित्यपाठातली पदे नित्यक्रमाने म्हणून झाल्यावर घरातील एका मुलाने अभंग म्हणावा असा घरचा नित्यपाठ. त्या दिवशी तो म्हणण्याची पाळी माझ्यावर आली. दिवस पडला तेव्हा

अकस्मात मला त्याची आठवण झाली. भजनाची पुस्तके कपाटात बंद होती. मी कागद पेन्सिल घेऊन माडीवर गेलो. अभंग लिहून पाठ केला आणि तोच भजनात म्हटला. शेवटच्या चरणातल्या 'बाकी म्हणे' ने आफत आली दार्जींनी मला खोलीत बोलावून घेतले आणि संतांच्या अभंगात आपले नाव घालणे पाप आहे, असे सांगितले. मी त्यांना सांगून पाहिले हा मी लिहिलाय. पटेना. मग दुसरा अभंग लिहून खात्री पटवावी लागली. दार्जींना कौतुक वाटलं. आजीकडे नेलं व झाला प्रकार अभिमानाने सांगितला. पण आजी विथरली. आजोबांनी मौन घेऊन संसाराकडे पाठ फिरवली होती. देवळात कीर्तनाला गेल्या ठिकाणी विहिरीत पडून त्यांना अपघाती मरण आलं होतं. मी अभंग केल्यामुळे आणखी चार शिव्या मोजल्या आणि यापुढे अभंग करणार नाही, असं त्याच देवापुढे वचन घेतलं. बा. भं.च्या रूपाने आपला नवराच परत आलाय, असं त्यांच्या आजीला वाटायचं. हा मुलगा तऱ्हेवाईक होऊ नये म्हणून ती त्यांना जपायची. आत्या त्यांना 'बाकीट' म्हणायची. बाळकृष्णाचे हे अपभ्रष्ट रूप. गोव्यात बाव म्हणजे बाबा. कानडी प्रांतात माम म्हणतात. आजीला जरी कविता लिहिणार नाही, असं सांगितलं तरी १९ व्या वर्षी मुंबईला जाताना त्यांनी एक कविता रचली. 'बोटीचा पहिला प्रवास. प्रेयसीपासून मी दूर दूर जात होतो. मन भरून आलं होतं. व्याकुळ होतं. कोण ही प्रेयसी? आईच्या नात्यातली. पण प्रेम व्यक्त करता येत नव्हतं. आजीने चुलत भावाची मुलगी माझ्यासाठी मुक्रर करून ठेवली होती.' बोरकरांनी आपल्या हस्तलिखित अप्रकाशित आत्मचरित्रात लिहून ठेवलंय. हे खरंखुरं पण असफल प्रेम होतं. या अशा मनोवृत्तीतून कवितेचा जन्म झाल्यामुळे भावनेशी सुसंबद्ध अशा निसर्गप्रतिमा घेऊन आलेल्या या कवितेची पार्श्वभूमी ही अशी आहे. माझी 'आगबोट' ही ती कविता —

*नारळींचे वृक्ष स्तब्ध प्रेमस्तंभ उभे*
*पर्णाआड पक्षी जणू भाव हृदी दबे*
*हेमंताचे दीस तरी हृदी उष्ण वातग*
*माझी आगबोट चालली दरियात ग*

पुढे रुक्मिणीशी त्यांचा विवाह झाला. त्यांचं वैवाहिक जीवन सर्वार्थानं यशस्वी झालं. पत्नीविषयी त्यांच्या मनात वसत असलेला पूज्य भाव आणि पत्नीविषयीचे त्यांचे प्रेम कवितेतूनही व्यक्त झालंय.

*असह्य एकटेपणी तुझीच ओढ लागते*
*पुनश्च मर्गळीतहि प्रसन्न ज्योत जागते*

या वास्तूत या पती-पत्नींचा, त्यांच्या मुलांचा वावर झाला असेल. रसिक अशा कविराजांनी आपल्या पत्नीला आपल्या कविता वाचून दाखवल्या असतील. रक्मिणीबाईंना आपल्या पतीचा अभिमान वाटला असेल.

रविकिरण मंडळाच्या अखेरीनंतर आलेलं मळभ आपल्या चैतन्यशील काव्याने दूर करणारे कवी म्हणून बोरकरांचे श्रेय मोठे आहे. बोरकरांचे काव्य-सौंदर्याच्या आणि शिवाच्या विविध स्वरूपांची उत्कटतेने उपासना करणारे आहे. त्यांच्या आंतरिक भावविश्वात आकाश-पृथ्वीवरील



अनुक्रमणिका

सुंदरतेचे स्थूल व सूक्ष्म संस्कार रुतून बसले आहेत. काव्यातून व्यक्त होणारे कवीचे व्यक्तिमत्त्व सौंदर्याचा शोध घेणारे, मांगल्याचे पूजन करणारे आणि कोणत्याही भावनेच्या अनुभवात बेहोषीने बुडून जाणारे असे आहे. 'सरीवर सरी आल्या ग' असे म्हणत आपल्याच तालात खास कोंकणी ढंगात गाणारे बाकी बाब - त्यांचा आवाज थेट हृदयाला जाऊन भिडणारा.

*मी तू पण सारे विसरून*
*आपणही जाऊ मिसळून*
*सरिवर सरी आल्या ग*
*दुधात न्हाउनि धाल्या ग*

*मल्हाराची जळात धून*
*वीज नाचते अधूनमधून*
*वनात गेला मोर भिजून*
*घुमतो पावा सांग कुठून*

हा पावा त्यांच्या मनात सतत घुमत होता, म्हणून अखेरपर्यंत त्यांची कवितासखी त्यांच्यापासून कधीच दूर झाली नाही.

बोरकरांचं घर पाहण्यासाठी मी आले होते. पण मनाने त्यांच्या काव्यप्रांतात हिंडत होते. 'चहा घेता नं' बोरकरांच्या वहिनींनी विचारलं, तेव्हा कुठे मी भानावर आले. चहापाणी झाल्यावर बोरकरांच्या वहिनी — सगळेजण त्यांना रतनकाकू म्हणतात — त्या आमच्याशी गप्पा मारायला लागल्या. या खरं तर मुंबईच्या. कानविंदे हे त्यांचं माहेर. आता त्या इथे एकट्याच राहतात. त्यांचे यजमान मेडिकल रिप्रेझेंटेटिव्ह होते. निवृत्त झाल्यावर इथे आले. रतनकाकूंना इथे येऊन १५ वर्षं झाली. घर दाखवता दाखवता काकू माहिती पुरवित होत्या. घर ऐसपैस मोठं. घरात पाऊल ठेवल्यावर मन प्रसन्न व्हावं असं. कौलारू, छत उंच असलेलं अशी घरं मला फार आवडतात. त्यावर माझं मन जडतं. घराच्या दर्शनी भागात कठड्याचा व्हरांडा. घर दोन मजली. खाली उजव्या हाताला वास्तूदेवतेची खोली. ही फक्त सारवलेली होती. हे घर ७५-८० वर्षांपूर्वीचं. जुन्या घराची डागडुजी करून नवीन सुधारणा केल्या आहेत. भिंतींना प्लॅस्टर केलंय, जमिनीला फरशी घातलीय. पूर्वी सगळ्या घराला सारवण असे. आणखी इतर खोल्याही मोठ्या, प्रशस्त. पाठीमागे स्वयंपाकघर. त्यात काँक्रिटची चूल. काळ बदलला, स्वरूप बदललं. एका बाजूला ओटा त्यावर गॅसही. खाली मोठा प्रशस्त दिवाणखाना. त्यात सुंदर पलंग, नक्षीदार फर्निचर, छत उंच असल्याने दिवाणखाना भव्य वाटत होता. वरच्या मजल्यावरही मोठ्या प्रशस्त खोल्या. तिथे खूपसं सामान पडलेलं. एवढं मोठ घर पण आता घरातली माणसं व्यवसाय-धंद्यानिमित्ताने घरातून बाहेरगावी गेलेली आणि घर असं ओस पडलेलं. पण काकू ते सांभाळताहेत. बोरकरांकडे गणपती दीड दिवसांचा असतो. गणपतीला बोरकर मंडळी येतात. चुलतभाऊ, त्यांच्या बायका येतात. घर त्या दिवसांत परत गजबजून जातं. गणपतीखेरिज शांतादुर्गा आणि महालक्ष्मी ही दैवते. गणपती बसवण्यासाठी खास वेगळे










दालन.

आपल्या दिराच्या आठवणी रतनकाकू सांगत होत्या. 'बोरकर कविता गाऊन दाखवत. ते माझ्याशी मराठीत बोलत. मी मुंबईची. मला कोंकणी कुठे येत होते ! आता येते. बोरकर मंडळी फार तापट. सासरेही तापट. राग जसा पटकन् यायचा तसा जायचाही.'

घर पाहून झाल्यावर आम्ही पुढच्या अंगणात हिंडून आलो. पाठीमागे हिंडून आलो. मागच्या अंगणात मोठाली आंबा फणसाची झाडं मोहरली होती. पाठीमागे डोंगर. घराच्या बाजूने उंच झाडं असल्याने एकूण घरातच छान गारवा होता. काकूंना विचारलं आणखी कोणी नाही का इथे — 'सासूबाई २५-३० वर्षांपूर्वी वारल्या. सासरे आधीच वारले होते. यजमानही गेले. एकटी रहाते. सोबतीला बाई येते. दिवसभर देवाचं नामस्मरण करते. मोठ्या टाइपमधली पुस्तकं वाचते.' काकू आता सुमारे ७५ वर्षांच्या आहेत. वय झालं तरी त्यांची स्मृती चांगली होती. त्यांचा निरोप घेऊन निघालो. कुडचडं गाठायचं होतं. 'आला त्या रस्त्याने सरळ चालत जा. थोडं चालावं लागेल. डाव्या हाताच्या थांब्याकडे जाताना दोन रस्ते फुटतात. तिथेही डाव्या हाताच्या थांब्याला जा. तिथे कुडचड्याची बस मिळेल.' निरोप घेऊन आम्ही निघालो.

थोड्या वेळातच शिरोडे — सवर्डे गाडी मिळाली. जाताना दाबोली बीच लागला. ऊन तापल्याने पाणी चमचमच होतं. रूपेरी लाटांवर लाटा समुद्रात फुटत होत्या. पर्जन्योत्तर काळात गोव्याची हवा सुखद असते. गोव्याचा समुद्रकिनारा समृद्ध आहे. त्यासाठी भूगोल ठाऊक हवा. भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरच्या गोव्याच्या समुद्रकिनाऱ्याची दक्षिणोत्तर लांबी १०५ किलोमीटर तर पूर्व-पश्चिम ६० किलोमीटर. मांडवी, जुवारी आणि त्यांच्या उपनद्या यामुळे गोव्याच्या उत्तर भागात सर्वत्र अनेक बेटं आहेत. जलमार्गामुळे उत्कृष्ट बंदर. खनिजांच्या बाबतीत गोवा समृद्ध. एकेकाळी कदंबांच्या सत्तेचा काळ होता, तेव्हा गोव्यातील भरभराटीचा काळ होता. पुरातन काळी इथे गोधनाची विपुलता असल्यामुळे हे नाव पडले. १३ व्या शतकात देवगिरीच्या यादवांनी कदंबांना मांडलिक बनवून गोमंतक आपल्या सत्तेखाली आणला. गोव्यात यादवांची सत्ता १०१ वर्षे होती. यानंतर बहमनी सुलतानाने गोव्यावर स्वारी केली. यानंतर १५१० साली पोर्तुगीज सरदार अफांसो द अल्बुकर्क याने गोवा हस्तगत केले. १५४२ सालापासून ख्रिस्ती धर्मप्रसारक सेंट फ्रान्सिस झेव्हियरने गोव्यात सक्तीच्या धर्मप्रसारला सुरुवात केली. १६ व्या शतकाच्या अखेरीस गोव्याचे ख्रिस्ती वैभव कळसाला पोहोचले होते. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात शिवाजी महाराजांनी कोंकणपट्टीत किल्ले बांधून आरमार वाढवल्यावर पोर्तुगीजांना दहशत निर्माण झाली. १६७५ मध्ये त्यांनी फोंडा किल्ला जिंकला. २० व्या शतकात पोर्तुगीज सत्ता झुगारून देण्यासाठी अनेक प्रयत्न झाले.

१९४८ मध्ये राम मनोहर लोहियांच्या नेतृत्वाखाली सविनय कायदेभंगाचे आंदोलन झाले. गोव्यात स्वातंत्र्ययज्ञ पेटत असल्याचं बोरकरांच्या कविमनाला जाणवलं. डॉ. लोहियांच्या सभेत कॅप्टन मिरांडांनी त्यांच्यावर पिस्तुल रोखलं पण त्यांनी भाषण चालू ठेवलं. बोरकर हे दृष्य पहात होते. त्यांच्या हृदयात देशभक्तीचा अंगार चेतवला गेला.

आणि











*चढवू गगनी निशाण अमुचे चढवू गगनी निशाण*
*कोटी मुखांनी गर्जू जयजय स्वतंत्र हिंदुस्थान*
*त्रिवार मंगल वार आजला त्रिवार मंगलवार*
*स्वातंत्र्याची सिंहगर्जना अता इथे उठणार*

ही स्फूर्तिगीतं चैतन्याने ओथंबलेली अशी त्यांच्या कविप्रतिभेतून साकारली. त्यांनी स्वातंत्र्य संग्रामात उडी घेतली. फोंडा येथे प्रभात फेरीचं नेतृत्व केलं. कायदेभंग करायला सुरुवात केली. पुढे त्यांना गोवा सोडावा लागला. पुण्यात त्यांनी बिऱ्हाड हलवलं. आपल्या कायम झालेल्या सरकारी नोकरीवर त्यांनी सहजपणे तिलांजली दिली. गोव्याच्या स्वातंत्र्याचा ध्यास त्यांना स्वस्थ बसू देईना. नोकरी नव्हती. लेखनावर चार पैसे मिळत. पण अशा परिस्थितीतही त्यांनी संसार चालवला आणि चळवळही. मातृभूमीच्या स्वातंत्र्याचा ध्यास घेतलेल्या कवीच्या जन्मग्रामी आम्ही आता पोहोचणार होतो.

कुडचड्याला पोहोचलो तो दीड वाजायला आला होता. इच्छित गाव दिसू लागलं. सावर्ड्याला सत्याग्रह झाला होता. त्यामुळे सावर्ड्याचं नाव ऐकलेलं होतं. मधे पूल आहे म्हणून पलीकडे सावर्डे आणि अलिकडे कुडचडे. इथे रेल्वे स्टेशन आहे. इथे नदी आहे जुवारी. ही नदीच बोरीला जाते. मॅंगेनिज आयनोरचे सगळीकडे रस्त्याच्या कडेला ढीग होते. उतरल्यावर डी. पी. कुडचडकरांचे मेडिकल स्टोअर शोधून काढले. दुकान उघडे होते. कुडचडकर मंडळी जेवायला घरी गेली होती. तेथूनच त्यांच्या घरी फोन केला. रिक्षाने कसे यायचे विचारले. तर त्यांनी दुकानातच थांबा गाडी घेऊन न्यायला येतो, असं सांगितलं आणि दहा मिनिटात देवीदास कुडचडकरांचे चिरंजीव आम्हाला घ्यायला आले. गाडीत बसल्याने आणि घराची शोधाशोध करावी न लागल्याने कुडचडकरांच्या घरी लवकर पोहोचलो. घरात सर्वच मंडळी होती. त्यांना आमचा परिचय करून दिला. येण्याचं कारण सांगितलं. त्यांनी स्वागत केलं. हातपाय धुवून पानावरच बसवलं. खरं तर आम्ही ऐनवेळच्या पाहुण्या होतो. थोडा संकोच वाटला पण घरातील बायका माणसांच्या आतिथ्यशील वागणुकीने संकोच दूर पळाला. भूक सपाटून लागली होती. म्हापसा, पोरवरीम्, पणजी, बोरी, कुडचडं असा प्रवास सकाळपासून झाला होता. दोन्ही सुना आग्रह करून वाढत होत्या. खास गोव्याच्या पद्धतीचं मासळीचं कालवण आणि तळण जेवणात होतं. मी ते आवडीने खाल्लं. हात धुवून आम्ही दिवाणखान्यात आलो. मी आधुनिक पद्धतीचं प्रशस्त असं ते घर न्याहाळत होते, तोच बोरकरांचे मामेभाऊ देवीदास कुडचडकर म्हणाले, या घराचे आर्किटेक्चरचे काम बा. भ. बोरकरांच्या 'बोरीये भाऊजीं'कडून घेतलं. समोरचं घर जुनं. हे नंतर बांधलं. थोरल्या मामांनी म्हणजे 'वडलो मामांनी बांधलं' आम्ही गप्पा मारत होतो. तेवढ्यात देवीदास कुडचडकरांची दोन्ही मुलं तिथे आली. एक मेडिकल स्टोअर्स पहातो. एक मॅंगेनीजची खाण. त्यांच्या बायकांची ओळख करून दिली. देवीदास कुडचडकरांच्या पत्नी बोलक्या, छान स्वभावाच्या. पहिल्याच भेटीत परकेपणा मुळीच जाणवला नाही. बोरकरांचे मामा-मामी काठी टेकीत आले. एक नांदतं एकत्र कुटुंब पाहून मन सुखावलं. बोरकरांच्या कितीतरी आठवणी त्यांना आल्या. बोरकरांचे आजोबा लाडकोबा धोंडू

कुडचडकर देवमाणूस. सकाळ-संध्याकाळ भजन करीत. बोरकरांच्या आजी लवकर वारल्या. त्यांनी सांगितलं, बोरकरांचं खाजगी शिक्षण बोरीत झालं. मग पुढील शिक्षणासाठी फोंड्याला नंतर पोरवरीम्. चुलत चुलते होते, तिथे ते आठव्या इयत्तेत शिकायला गेले. पुढे धारवाडला मॅट्रिकचं शिक्षण घ्यायला गेले. असं त्रिस्थळी त्यांचं शिक्षण झालं. धारवाडच्या कर्नाटक महाविद्यालयात नाव घातलं पण घरच्या परिस्थितीमुळे त्यांना ते सोडून नोकरी धरावी लागली. पहिली नोकरी त्यांनी वास्कोला सेंट जोसेफ इन्स्टिट्यूटमध्ये धरली. नोकऱ्याही बदलल्या. म्हापशाजवळ असलेल्या हणजुण या सुंदर समुद्र किनारा असलेल्या गावीही त्यांनी नोकरी धरली. ३२ साली कोल्हापूरला साहित्य संमेलन झालं, तिथे त्यांनी आपली कविता वाचली आणि त्यामुळे ते लोकांना परिचित झाले. काव्यगायन करण्याची त्यांना मोठी हौस. मधुर आवाजाची निसर्गदत्त देणगी. त्यांना रवींद्रनाथांच्या कवितेने झपाटले. त्यांनी भा. रा. तांबे यांची कविता वाचली. बायरन, कीटस्, शेले या पाश्चात्य कवींच्या कविता त्यांनी वाचून काढल्या. मराठीत कविता लिहीत असतानाच ते कोंकणी साहित्य निर्मितीकडे वळले. १९३४ साली बडोद्याला साहित्यसंमेलन भरलं. बोरकरांनी 'तेथे कर माझे जुळती' आणि 'मुशाफिरा' या दोन कविता वाचल्या. या संमेलनात उत्कृष्ट कवितेला सुवर्णपदक ठेवलं होतं. ते बोरकरांच्या 'तेथे कर माझे जुळती'ला मिळाले. माधव जूलियन अध्यक्ष होते.

*दिव्यत्वाची जिथे प्रचिती*
*तेथे कर माझे जुळती*

हे गीत, ही आदरांजली ऐकताना गीतातला नाद आणि सौष्ठव एकत्रितपणे जाणवतं. बोरकरांचे मामेभाऊ सांगत होते, 'पणजीला महालक्ष्मीचं देऊळ आहे. तिथे बोरकर गेले असता तेथील देवी, देवळातला समईचा मंद प्रकाश या साऱ्या वातावरणात त्यांना ही कविता सुचली.

बोरकर मोठ्या आत्मविश्वासाने कविता गायचे.

*चालती किती जगे*
*किती युगे मुशाफिरा*
*एकलेपणा तुझा असह्य हे*
*चराचरा*

१९३४ ते ८४ या प्रदीर्घ अर्धशतकातल्या त्यांच्या काव्यगायनातली अपूर्वाई कधीच मंदावली नाही.

तार — या किनाऱ्यावरून त्या किनाऱ्यावर जाणे, 'तार जाय बंदरा' या कवितेत आलेल्या तार या शब्दाचा नेमका अर्थ गद्यात गवसला. अनेक कवितांचे संदर्भ जुळत होते. 'जपानी रमलेची रात' रियासा बोट इथे बंदरात आली तेव्हा ही कविता त्यांना सुचली. 'महात्मायन' लिहायला त्यांनी कुडचड्याच्या या घरातच सुरुवात केली. कविता लिहिताना ध्यास लागला पाहिजे, असं ते सांगत. कोंकणीवर त्यांचं भारी प्रेम. कोकणी स्वतंत्र भाषा आहे असं ते मानत. गोवामुक्तीनंतर बोरकर गोव्यात परतले तेव्हा मुंबईतला कोकणी-मराठी वाद गोव्यात आला

होता. १९६७ साली त्यांना पद्मश्री किताब मिळाला. गोमंतकियाला मिळालेला हा पहिला सन्मान. पुढे १९७५ साली कोकणीला साहित्य अकादमीची मान्यता मिळाली. १९८१ मध्ये 'सायास' या त्यांच्या कवितासंग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. १९७० ला महाबळेश्वर येथे विभागीय साहित्यसंमेलन झाले; त्याचे ते अध्यक्षही झाले. आयुष्यात त्यांना अनेक मानसन्मान मिळाले. बोरकर तृप्त होते. या तृप्तीतच त्यांनी एक आस मनाशी बाळगली—

*तृप्त स्वतंत्र गोव्यात केव्हातरी केव्हातरी*
*फेसाळत्या लाटापाशी सिंधु सरितेच्या तिरी*
*बांधीन मी छोटेसेच लाल चिरेबंदी घर*
*गार विलायती वेल चढवीन भिंतीवर*

बोरकरांच्या कवितेविषयीच्या या गप्पा न संपणाऱ्या. आलो तसाच प्रवास करत म्हापशाला पोहोचायचं होतं. म्हणजे वेळेचं बंधन होतं. उन्हं थोडी खाली आल्यावर चहा घेतला. बोरकरांच्या मामेवहिनींनी सारं घर हिंडून दाखवलं. घर मोठं प्रशस्त, ऐसपैस. घराच्या बांधणीवर पोतुर्गीज वास्तुशैलीचा छाप. एकूणच गोव्याच्या घरांवर पोर्तुगीज वास्तुशैलीचा छाप दिसते. आधुनिकता असली तरी घर कौलारू. पुढे-मागे अंगण. वहिनींनी देवघर दाखवलं. दत्ताची पूजा बोरकरांचे आजोबा करीत. त्या दत्ताची मूर्ती देवघरात पूजेत अजूनही आहे. अशीच मूर्ती बोरीच्या घरातही आहे. इथला मुख्य सण गणपती — दीड दिवसांचा. सार्वजनिक पूजा फारशी नाही. प्रत्येकाच्या घरी गणपती बसवतात. एवढंच काय गोव्यातील बाटलेले खिश्चन आजही घरात छोट्या गणपतीची मूर्ती ठेऊन त्याची पूजा त्यांच्याकडे केली जाते. धर्म बदलला पण मनावरचे संस्कार बदलणे अशक्य. शांतादुर्गा ही कुडचडकरांची कुलदेवता. आणि साखळीचा दत्तात्रेय कुलदेव. महादेव हा ग्रामदेव. माघात पाच दिवस यात्रा असते. कवळ्याला पंचमीला महारथ काढतात. नऊ रात्र नऊ दिवस नवरात्र बसतं. पुरुष म्हारू हा मूळ देवाचा रक्षणकर्ता, त्याचे देऊळ आहे. म्हारूचं देऊळ पहायला जाऊ. जाताना गावही पाहता येईल, म्हणून वहिनी आणि त्यांचा मोठा मुलगा बरोबर आले. मँगेनिज काही ठिकाणी रेतीच्या स्वरूपात दिसत होतं. त्याचे छोटे-छोटे डोंगर रचले होते. सगळीकडे माडाची झाडं. फणस, आंबे त्यामुळे सगळ्या गावावरच सावली धरल्यासारखं वाटत होतं. कुडचडं पणजीपासून ५६ किलोमीटर. इथे नगरपालिका आहे. देवीदास कुडचडकर २५ वर्षं सरपंच होते. आता त्यांनी राजकारण सोडलंय. सर्वोदय हायस्कूल गावात आहे. त्याचे ते सेक्रेटरी आहेत. इथे आता कॉम्प्युटर सेक्शन सुरू केला आहे. त्याला कुडचडकरांच्या वडिलांचे नाव दिले आहे. गावातनं जाताना बोरकरांच्या नावाचं पद्मश्री बाकीबाब बोरकर असं नाव दिलेलं वाचनालय लागलं. म्हारूचं देऊळ घराजवळच आहे. हा कुडचडकर मंडळींचा देव. कुडचडकरांचं मूळ आडनाव रेगे. कुडचड्याचे म्हणून कुडचडकर म्हणतात. या म्हारूला नैवेद्य दारू, नारळ आणि रॉटचा दाखवतात. तांदळाच्या पिठाच्या पारीत गूळखोबरं वगैरे घालून ते नारळाच्या झावळ्यांवर भाजून हा रॉट करतात. हा नैवेद्य पुरुष म्हारूला देतात. दर रविवारी हा पाळीपाळीने द्यायचा. ह्या देऊळाच्या सगळ्या बाजूने नदी आहे. इथेच कुडचडकरांच्या मालकीचं माडाचं बन आहे. नदीच्या संथ जलाशयात

अनुक्रमणिका






बोट नांगरलेली होती. उन्ह उतरलं होतं. वातावरणात शीतलता होती. माडाच्या दाट बनात माड डुलत होते. हिरवाई डोळ्यात मावत नव्हती. त्या स्तब्ध शांत नदीकिनाऱ्यावरून कुठेही जाऊ नये असं मंत्रमुग्ध करणारं वातावरण होतं. होस्पेटहून इथे रेल्वेनी मँगेनीज येते. इथून पुढे बोटीने सारा माल जपानला जातो. कुडचडकरांची खाण इथून १५ किलोमीटरवर रिवंड येथे आहे. हे सांगे तालुक्यात येते. पूर्वी याचे नाव 'ऋषिवन' असे होते. 'सालावली'ला धरण आहे. हे 'सांगे' तालुक्यात येते. येथून पाणी दक्षिण गोव्यात येते. इथे प्रमुख उत्पन्न भातशेतीचं. बोरीला कुळागारं म्हणजे सुपारी-माडाची झाडं जास्त. इथे काजूबियांचा व्यापार चालतो. काजू, नारळ इथून बाहेर पाठवले जातात.

कुडचड्यात कोकणी बोली. बाहेरून येऊन स्थायिक झालेले लोकही कोकणी बोलतात. कुडचडकर मंडळी एकमेकांशी कोकणीतून बोलत होती. काही शब्द कळत होते, पण सर्वच काही समजत नव्हतं. परतताना बोरकरांच्या आजोळच्या जुन्या घरी गेलो. देवीदास कुडचडकरांच्या घराच्या जवळच हे घर आहे. हे घर जुनं झालं होतं. आता पाडून परत बांधलंय. जुनं घर मातीमध्ये बांधलेलं कौलारू होतं. वर माडी होती. पाठीमागे गोठा होता. गुरं होती. परसात फणस, आंबा, कोंकणचा मेवा. हे घरही ऐसपैस. बोरकरांचा जिथे जन्म झाला ती खोली बंद होती. ती उघडून दाखवली. तिथे खूप अंधार होता. गोमंतकाच्या या महाकवीचा जन्म या वास्तूत झाला होता. किती भाग्यवान ही वास्तू. बोरकरांच्या दुसऱ्या मामाची मंडळी या घरात राहतात. तेथून निघून परत कुडचडकरांकडे गेलो. सगळ्यांचा निरोप घेतला. निरोपाचा क्षण केव्हाही नकोच वाटतो. चार तासात त्या कुडचडकर मंडळींच्या अगत्यानी आम्ही भारावून गेलो होतो. एकंदर गोव्याची मंडळीच अगत्यशील म्हणून तर बा. भ.नी वर्णलंय -

*माझ्या गोव्याच्या भूमीत चाफा पानावीण फुले*
*भोळा भावडा शालीन*
*भाव शब्दाविण फुले*

सकाळी जेवतानाचं अगत्य तर वर्णनातीत होतं.

*माझ्या गोव्याच्या भूमीत*
*गड्या साळीचा रे भात*
*वाढी आईच्या मायेने*
*सोनकेवड्याचा हात*

या ओव्या अगदी तंतोतंत जाणवत होत्या.

*आतिथ्याची अगत्याची*
*साऱ्या षड्रसांची नांदी.*

कुडचकर मंडळींच्या स्वभावाशी हे वर्णन अगदी तंतोतंत जुळणारं. निरोप घेऊन निघालो. देवीदास कुडचडकरांचा मुलगा स्टँडपर्यंत सोडायला आला. पणजीच्या बसमध्ये बसून परतीच्या प्रवासाला निघालो. परत तोच निसर्ग सोबतीला होता. फुललेले शेवगे, त्याच्या नाजूकशा शेंगा

डुलाप्रमाणे लोंबत होत्या. नीरफणस लागले. याची पानं लहान असतात. हे खाऱ्या पाण्यावर येतात. 'माझे घर' या कवितेत बोरकरांनी या नीर फणसाचा उल्लेख केलाय. ते आठवलं -

मागे विहीर कांठाची वर प्राजक्ताचे झाड
गर्द हिरवे न्हाणीशी नीर फणसाचे झाड
केळबनाच्या कडेला स्वच्छ छोटासाच गोठा
त्यात सवत्स कपिला, ओल्या चाऱ्याचा निसाण

याच कवितेत बोरकर शेवटी म्हणतात -

*असे माझे गोड घर केव्हातरी केव्हातरी*
*अक्षरांच्या वाटेनेच उतरेल भुईवरी*

ही कौलारू सुबक घरं माझ्या मनात तर सदैवच घर करून बसणार आहेत.

परत तोच घाट लागला. आता घाटात दिवे लुकलुकत होते. पांढरे बगळ्यांचे थवे पाणथळ जागेवरून उडून आकाशात झेपावले होते. ठिकठिकाणी फुललेली कमळं आता रात्र होताच मिटणार होती. पांढरे बगळे, हिरवी शेतं, सतेज वृक्षवल्ली, तांबूस मोहोर, रंग, गंध एकाच वेळी भावत होते.

*हिरवळ आणिक पाणी*
*तेथे स्फुरती मजला गाणी*
*निळीतून पाखरे पांढरी किलबिलती थव्यांनी*

असं दृष्य पाहताच कविराजांची प्रतिभा ओसंडून वाहणारच. एकाच नाहीतर अनेक काव्यपंक्तीतून -

*ढवळे ढवळे ढग खवल्यांचे निळीत वळती इवले इवले*
*सरी ओवल्यागत ओघळती हरळीवरती निळसर बगळे*

किंवा -

*फुलपाखरा फूल थव्यावर*
*कुठे सांडली कुंकुमटिंबे*
*आरसपानी पाण्यावरती*
*तरत्या बगळ्यांची प्रतिबिंबे*

किती प्रकारच्या प्रतिमातून कवी आपली कल्पनाशक्ती प्रस्फुटित करतो, याची ही झलक. बोरकरांना लाभलेले कवीचे डोळे निसर्गाचा सतत वेध घेणारे होते. म्हणून तर ते 'निसर्गपूजक' होते. आणि 'सौंदर्याचे उपासक' होते. गोमंतकांच्या निसर्गरम्य परिसरात त्यांच्या कवितेला नवनवोन्मेषशाली धुमारे फुटले.

*कूस तुझी नवरत्नकेतकी पराग भासत कोटी ग ।*
*अन् चंद्राची भरून वाहे तुझी सुवासिन ओटी ग ।*

आकाशमाऊलीस दिलेली ही उपमाही सुंदर अतिसुंदर 'कोर बिलोरी तुझ्या कपाळी, शिरी मोत्यांची जाळी ग ' हे सारे बोल मराठीतून येत होते. पण,

*गोयं आमचे मूळ पीठ कोंकणी आमची भास*
*तांच्या जणीं तणीं आमच्या मुक्तीचे विलास*

असे ते प्रांजळपणे म्हणतात.

काळाशार डांबरी रस्ता आणि निळभोर आकाश काहीच आता दिसत नव्हतं. रात्रीचा अंधार दाटला होता. फक्त वकुळीचा वास नाकाला सुखावत होता. कोणीतरी वसमध्ये वकुळीचा वळेसर माळला होता. त्या उग्रमंद वासाने आणि गारव्याने किंचित डुलकी लागली. कारण दिवसभर भटकंती झाली होती. त्या तंद्रीतच मधूनच डोळे उघडत होते, मिटत होते. वस पणजीच्या रस्त्याला लागली ते दिव्यांच्या झगमगाटावरून समजले. पणजीला कदंब स्टँडवर उतरून म्हापशाला जाणाऱ्या बसमध्ये बसलो. दुसऱ्या दिवशी परत पणजीला येऊन बोरकरांच्या बहिणीला हिराबाईंना भेटावे असे मनात होते. त्याप्रमाणे त्यांना भेटलोही. पणजीत त्या आपल्या मुलीकडे राहतात. त्यांना खूप आनंद झाला. सत्तरीच्या पुढच्या ठेंगण्या, ठुसक्या, गोऱ्या, गव्हाळ वर्णाच्या हिरावाईंजवळ आपल्या भावाच्या अनेक आठवणी होत्या. त्यांना स्वत:लाही कविता करण्याचा नाद आहे. त्यांनी स्वत:च्या अनेक कविता पाठ म्हणून दाखवल्या आणि बा. भं.च्याही. बा. भ. आम्हा बहिणींना कविता म्हणून दाखवत. चाली लावून घेऊन आम्हालाही म्हणायला लावत. स्वत: मात्र ठराविक चालीत म्हणत. हिराबाईंनी सांगितलं. बोलका स्वभाव, आणि बोलणं गोड त्यामुळे बोरकर सगळ्यांचे लाडके होते. आमची आईसुद्धा सातवी शिकली होती. तिचे वाचन दांडगे होते. हिरावाई खुलून सांगत होत्या. बोरकर अतिशय हुषार. मॅट्रिकनंतर त्यांना स्कॉलरशीपही मिळाली होती. पण त्यांना शिक्षण घेता आलं नाही. नोकरी करावी लागली. नदीकाठी अथवा डोंगरावर बसून ते कविता करत. त्यांनी खूप आठवणी सांगितल्या. त्यातली ही आठवण चांगली वाटली. त्या म्हणाल्या, 'लहानपणी आम्हाला पैसे मिळत नसत. एकदा जत्रेला गेलो असताना आम्हा सर्व भावंडांना पैसे दिले. बोरकरांनी त्या पैशाचं पुस्तक आणलं. आजोबा रागावले, 'कशाला आणलंस पुस्तक ! घरात एवढी पुस्तकं असताना?'

बोरकरांचा स्वभाव जिद्दी होता. म्हापशाच्या शाळेत शिकवत असताना त्यांनी वयाच्या २२ व्या वर्षी पुनर्विवाहाची चळवळ केली. सुरुवातीला धोतर-कोट असा त्यांचा पेहेराव असे. पोतुर्गीज शाळेत गेल्यावर गावचा पोषाख सोडला आणि शर्टपँट वापरू लागले. बारीक, रंग काळसर पण रेखीव आणि बुद्धीने तल्लख होते. घरात सतत राबता असे. त्यांना माणसांचा कंटाळा कधीच नसे. हिराबाईंनी पाहुणचार केला. दीड-दोन घटकांमध्ये त्यांनी बोरकरांच्या आणि स्वत:च्या कविता पाठ म्हणून दाखवल्या. या वयातली त्यांची पाठांतरशक्ती थक्क करणारी होती. अजूनही त्यांना खूप गप्पा मारायच्या होत्या. पण आम्हाला दुपारी सामान आवरून संध्याकाळच्या गाडीने पुण्याला जायचे होते. त्यांचा निरोप घेतला.

आता गोव्याचाही निरोप घ्यायची वेळ आली. सौंदर्याचा प्रमुख गुण मनस्वीपणा. तो गोव्याच्या प्रत्येक वस्तुजातातील सौदर्यात दिसून येत होता. तो मी माझ्या चक्षूंनी आणि मन:चक्षूंनीही टिपला होता.

प्रपातातुनी संतत घुमतो



अनुक्रमणिका






खर्जामधला षड्जाचा स्वर

हा 'स्वर' कानात साठवत गोव्याचा निरोप घेतला.

संध्याकाळ कलली. गाडी हलली. सांध्य रंगही मावळले.

रंग संध्याकाळचे
मी हेरिले अन् चोरिले
रात होता दाट
जीवीं ते न हाती राहिले

अशी काहीशी अवस्था परतताना होती, हे निश्चित. कारण संध्यासमयीचे क्षितीजकडेवरचे ते नानाविध रंग माझ्याबरोबर मनात होते की त्या क्षितीजावरच मी ठेऊन आले ! क्षणभर विचार करतानाही मनाचा गोंधळ गोवा सोडताना होत होता.

□□

डॉ. मंदा खांडगे, २४, ऋणानुबंध, डी. पी. रोड, औंध, पुणे ४११००७

---

## म. सा. परिषद नवे आजीव सभासद

अत्तरदे प्रहर्ष श्रीराम, धुळे
महाले सौ. सुमन पितांबर, धुळे
निलावार सौ. शोभना मधुकर, यवतमाळ
निलावार श्री. मधुकर चिंतामणी, यवतमाळ
जोशी सुधाकर गणपती, लातुर
पाटील श्रीकांत जागेश्वरराव, वरोरा
गोंधळेकर श्रीकांत भास्करराव, अकोला
पाटील शिवाजी नीळकंठराव, अमरावती
धंवा मुरलीधर हरिश्चंद्र, डोंबिवली
शिंदे धनंजय पांडुरंग, डोंबिवली
कर्णिक सौ. प्रतिभा रमाकांत, डोंबिवली
देसाई भालचंद्र शंकर, डोंबिवली
वझे अरुण रामचंद्र, डोंबिवली
जावळे सौ. पद्मावती भास्करराव, डोंबिवली
गुर्जर सौ. अरुंधती किशोर, ठाणे
साळी रवींद्र बी., पारोळा
गायकवाड भीमराव शंकरराव, शिराळा
वैद्य माधव यशवंत, धुळे
विवलकर सौ. प्रतिभा विवेक, डोंबिवली
कठाले सौ. मीनाक्षी गोपाळ, डोंबिवली
पेंडसे अनंत रघुनाथ, डोंबिवली
काणे सतीश गोपाळकृष्ण, अहमदनगर
कवाडे शरद रामदास, धुळे
पाटील एस्. ए., धुळे

## म. सा. परिषद नवे आजीव सभासद (अंबरनाथ शाखा)

गोखले राजेश दत्तात्रय, अंबरनाथ
सोनवणे नरेंद्र शांताराम, अंबरनाथ
लागू इरावती प्रकाश, अंबरनाथ
जोशी मिलींद केशव, अंबरनाथ
भोसेकर प्रणव एकनाथ, अंबरनाथ
सुभेदार मंदार यशवंत, अंबरनाथ
नाडगौडा समीर घन:श्याम, अंबरनाथ
पानसे सुरेश जनार्दन, अंबरनाथ



अनुक्रमणिका

डॉ. दत्तात्रेय पुंडे

# 'स्मृती' - कुसुमाग्रजांची एक मनोज्ञ कविता



'स्मृती' ही कुसुमाग्रजांच्या 'विशाखा' (१९४२) या काव्यसंग्रहात समाविष्ट असलेली कविता. 'विशाखा' हा काव्यसंग्रह त्यातील धगधगत्या, पेटत्या अदम्य स्वातंत्र्याकांक्षेसाठी अन् मानवता व समता या मूल्यांवर आधारित अशा भविष्यकालीन सामाजिक पुनर्रचनेच्या उद्घोषासाठी जितका गाजला, तितकाच तो त्या संग्रहातील प्रेमकवितेच्या आगळेवेगळेपणासाठीही गाजलेला आहे. कुसुमाग्रजांनी आत्यंतिक आत्मनिष्ठेची कोंडी फोडली, असे विधान 'विशाखा'तल्या त्यांच्या राजकीय व सामाजिक आशयाच्या कविता डोळ्यांसमोर ठेऊन केले जाते. ते खरेही आहे. पण 'विशाखा'तल्या त्यांच्या प्रेमकवितेकडे पाहता या विधानाची सत्यता जास्त पटते. अगदी 'प्रीतिवीण', 'नदीकिनारी', 'प्रतीक्षा', 'आश्वासन',



अनुक्रमणिका

## स्मृति

नवलाख तळपती दीप विजेचे येथ
उतरली तारकादळे जणू नगरात
  परि स्मरते आणिक करते व्याकुल केव्हा
त्या माजघरातिल मंद दिव्याची वात !

वाऱ्यावर येथिल रातराणि ही धुंद
टाकता उसासे, चरणचाल हो मन्द
  परि स्मरतो आणिक करतो व्याकुल केव्हा
त्या परसामधला एकच तो निशिगन्ध !

हेलावे भवती सागर येथ अफाट
तीरावर श्रीमान् इमारतींचा थाट
  परि स्मरतो आणिक करतो व्याकुल केव्हा
तो नदीकिनारा आणि भंगला घाट !

वेहोष चढे जलशांना येथिल रंग
रुणझुणता नूपुर जीव बने नि:संग
  परि स्मरतो आणिक करतो व्याकुल केव्हा
तू आर्त मला जो ऐकविलास अभंग !

लावण्यवतींचा लालस येथ निवास
मदिरेत माणकापरी तरारे फेस
  परि स्मरती आणिक करती व्याकुल केव्हा
ते उदास डोळे, त्यातिल करुण-विलास !

मुंबई १९४१

'ध्यास', 'कुतूहल', 'वनराणी' अशांसारख्या आरंभकालीन प्रेमकविता पाहिल्या तरीही रविकिरण मंडळकृत कोंडीतून मुक्त होण्याची कवी कुसुमाग्रजांची धडपडच दिसते. वरवर पाहता या कविता रविकिरणमंडळाच्या कवितेचेच अनुकरण असणाऱ्या वाटतात. काही प्रमाणात त्या तशा आहेतही. पण अशा कवितांमध्ये देखील कुसुमाग्रज रविकिरणमंडळातील कवींची आत्मनिमग्नता येऊ देत नाहीत. पण या वर निर्देशित केलेल्या प्रेमकवितांसाठी कुसुमाग्रज ओळखले जात नाहीत. कुसुमाग्रज वेगळ्या प्रकारची प्रेमकविता लिहिणारे कवी म्हणून ओळखले



अनुक्रमणिका

जातात, ते 'विशाखा'तल्या त्यांच्या 'स्वप्नांची समाप्ती', 'किनाऱ्यावर', 'तरीही केधवा', 'स्मृती', 'पृथ्वीचे प्रेमगीत' यांसारख्या विलक्षण अनोखे भावप्रदेश असणाऱ्या कवितांमुळे. या आगळ्यावेगळ्या कवितांमध्ये प्रेमातील आशानिराशांचे खेळ, प्रेमातील शारीर वा अशारिरी (प्लेटॉनिक) आकर्षण इत्यादी नित्यपरिचित आशयाच्या पलीकडे असलेल्या भावप्रदेशांवर कविप्रतिभेची नजर असल्याचे सहज लक्षात येते. हे भावप्रदेश विलक्षण तर आहेतच, पण मुख्य म्हणजे ते अलक्षितही आहेत. प्रेमातील स्वप्नाळूपणा, आंधळेपणा, झोकून देण्याची वृत्ती यांऐवजी प्रेम आणि जीवन यांच्यातील वास्तवसमांतर व वास्तवप्रखर व्यत्यास संशोधिण्यावर कुसुमाग्रजांची प्रतिभा येथे कार्यरत असल्याचे दिसते. त्यामुळेच 'स्वप्नाची समाप्ती', 'तरीही केधवा', 'स्मृती' यांसारख्या कविता रसिकांना आपल्या कविता, आपल्या स्वत:च्याच आसपास उमलणाऱ्या कविता वाटल्या असणार हे स्पष्टच आहे.

प्रेमकवितेतील विलक्षण, अनोखे भावप्रदेश संशोधणाऱ्या या चार-पाच कवितांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे विशेषीभूत आकृतिबंध. एखाद्या कुशल शिल्पकाराने सर्वांगसुंदर शिल्प रचावे, तशाच रीतीने जणू कुसुमाग्रजांनी या कवितांना जाणता-अजाणता आकारसौष्ठव प्राप्त करून दिलेले दिसते. 'स्मृती' या कवितेचे या दृष्टीने मुद्दाम निरीक्षण करता येईल.

स्मरण हा प्रीतीतील व्याकुळता सांगणारा संचारिभाव. ('स्मृती' प्रमाणेच 'तरीही केधवा' या कवितेतही हाच भाव आलेला आहे, पण वेगळ्या परिस्थितीत, वेगळ्या अंगाने.) प्रेयसीपासून दूर असल्यामुळे एरव्हीच प्रियकराच्या मनाला एक दैन्यावस्था येत असते. 'स्मृती'मध्ये ही दैन्यावस्था जास्त घनगर्द होत जाताना दिसते. भोगवादी वातावरणाने गजबजलेल्या श्रीमंत शहरातील जीवनकोलाहल आणि शांतसंयत वातावरणातील नि:शब्द आपलेपण जपणारे जीवनचैतन्य यांतील एक सुरेख विरोधचित्र कुसुमाग्रजांनी येथे उभे केलेले आहे. त्यामुळे दूरगावी असणाऱ्या प्रेयसीच्या सुखद स्मृती स्वमनात जपण्या-जोजावणाऱ्या हळव्या प्रियकराचे मनोगत एवढे साधे-सोपे एकपदरी (अत् एव नित्य-परिचित) भावरूप या कवितेला राहात नाही. 'स्मृती'मध्ये एक सलग स्मरणशृंखला आहे. तिचे एक टोक शहरी कोलाहलात आहे. (- बहुधा नव्हे, खात्रीने मुंबईत.)[१] तर दुसरे, प्रेयसीच्या शांत गावा (- बहुधा त्यावेळच्या, १९४१ च्या नाशिकमध्ये). ही दोन्ही टोके एकाच वेळी स्मरण आणि स्थितिविरोध यांच्या दुपेडी विणीने सांधलेली आहेत. त्याचे निरीक्षण मुद्दाम करावे.

| | | |
|---|---|---|
| १. | नगरात तळपणारे विजेचे असंख्य (=नवलाख) दिवे | '... माजघरातली मंद दिव्याची वात.' |
| २. | वाऱ्यावर उसासे टाकणारी धुंद रातराणी | 'परसामधला एकच तो निशिगंध' |
| ३ अ. | भोवती हेलावणारा अफाट सागर | नदीकिनारा |
| ३ ब. | त्या सागराच्या तीरावरच्या 'श्रीमान्' इमारतींचा थाट | 'भंगला' घाट |

| | | |
|---|---|---|
| ४. | वेहोषीचा रंग चढवणारे जलसे<br>आणि जीवाला नि:संग<br>बनवणारी रुणझुणती नूपुरे | 'तू आर्त मला जो<br>ऐकविलास अभंग' |
| ५ अ. | 'लावण्यवतींचा लालस येथ निवास' | उदास डोळे |
| ५ ब. | 'मदिरेत माणकापरि तरारे फेस' | त्या डोळ्यातील करुण-विलास |

येथे कुसुमाग्रजांनी कवितेच्या पाच कडव्यांमधून पाच विरोधचित्रे उभी केली आहेत. त्या सर्वांचा एकसंध, एकात्म परिणाम रसिकमनावर होतो. या एकात्मतेचे कारण प्रत्येक कडव्याची तिसरी ओळ (परि स्मरतो/स्मरते/स्मरती आणिक करतो/करते/करती व्याकुळ केव्हा...) समान आहे, हे होय. या एका ओळीमुळे हे काव्यशिल्प एकसंध बनले आहे, हे स्पष्टच आहे. प्रत्येक कडव्याच्या तिसऱ्या ओळीतल्या या समानतेचे हे इंगित न आकलल्यामुळे डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्यासारखे समीक्षक 'विषय इतका अलवार असूनही' ही कविता म्हणजे 'केवळ विटेवर वीट रचल्यासारखी झाली' असा अभिप्राय व्यक्त करताना दिसतात.[२] कुसुमाग्रजांच्या कवितांची शिल्पे जाणीवपूर्वक घडण्यापेक्षा त्यातील आशयाच्या जोरकसपणामुळे आणि उत्कट आविष्काराच्या प्रामाणिक तळमळीमुळे अजाणताच जास्त घडताना दिसतात. (याच एका बाबतीत कुसुमाग्रजांची बांधिलकी गोविंदाग्रजादि पूर्वकवींशी असल्याचे जाणवते. पु. शि. रेग्यांसारख्या आधुनिक कवींप्रमाणे जाणीवपूर्वक घासूनपुसून काव्यशिल्प घडवणारे ते कवी नाहीत.) त्यामुळे विटेवर वीट रचण्याचा आरोप कुसुमाग्रजांवर करता येणे, तसे कठीणच आहे. पण अशी विटेवर वीट रचल्याचा प्रकार जर कवीकडून झाला असेल, तर तो या कवितेत युक्त आहे का, मुख्य म्हणजे सौंदर्यजाणीव संपन्न करणारा आहे का, याचा शोध रसिकाने अन् समीक्षकाने घ्यायला हवा. म्हणून येथे कवितेची संरचना व तिच्यातून येणारा भावानुभव यांच्या परस्परसंबंधांचा प्रश्न उपस्थित करावासा वाटतो. अखेरत: एखाद्या कवितेचा संरचनेचा विचार करताना संरचना कशी दिसते, कशी भासते, कशी असते या विचारापेक्षा तिच्यातून येणारा काव्यानुभव, केवळ त्याच एका संरचनेद्वारे, सर्वांगांनी येतो की येत नाही, हा प्रश्न महत्त्वाचा ठरतो. कविता (किंवहुना कोणतीही वाङ्मयीन कलाकृती) ही एकाकृती, केवलाकृती असते. कवितेतून सूचित किंवा प्रक्षेपित केला जाणारा भावानुभव व त्या कवितेसाठी योजिलेली आकृती या दोन्ही गोष्टी एकजीव असतात, असायला हव्यात. स्मरणभाव आणि त्याचा विलय होण्यासारखी विरोधस्थिती यांची विशिष्ट रीतीची गुंफण असणारी 'स्मृती' ही अशी एकाकृती संरचना आहे. "The value of the poem is the experiencing, the realization, of aesthetically valuable qualities and relationship structurally present in the poem for any competent reader'[३]

असे जे रेने-वेलेक सारख्या टीकाकारांकडून म्हटले जाते ते 'स्मृती' सारख्या कवितेचे आकलन करून घेताना 'स्मृती'ची पृथगाकता केवळ तिच्यातल्या विरोधचित्रात नाही. शैलीदृष्ट्याही ही कविता एक सर्वांगसुंदर कविता आहे. कवितेतून जे सांगायचे आहे, त्यासाठी सु--योग्य अशी शैली कवीला गवसावी लागते. 'स्मृती'च्या बाबतीत अशी शैली कवी

कुसुमाग्रजांना खरोखरीच गवसली आहे, हे जाणवत राहते. येथे कुसुमाग्रज जागवत-जोजावत आहेत, तो प्रीतीतील स्मरणभाव. तो भाव उत्कट करण्याकरिता प्रत्येक कडव्यातील तिसरी ओळ समान राखली आहे, याचा उल्लेख अगोदर येऊन गेलाच आहे. पण ह्या तिसऱ्या ओळीतील आणि पाठोपाठ येणाऱ्या चौथ्या ओळीतील शब्दशैलीदेखील अशीच भावपोषण व भावजागरण करणारी आहे. परि या अव्ययापाठोपाठ स्मरतो (स्मरती/स्मरते) हे क्रियापद घेऊन वाक्य विधानाचा इतर भाग पुढे टाकला आहे. वास्तविक तो सर्वच्या सर्व क्रियापदापूर्वी यायला हवा. उदाहरणार्थ -

*परि स्मरतो आणिक करतो व्याकुल केव्हा*
*तू आर्त मला जो ऐकविलास अभंग*

या दोन ओळींतील शब्दक्रम मुद्दाम न्याहाळावा. 'पण तू मला जो आर्त अभंग ऐकविलास (तो) केव्हा (केव्हा) स्मरतो आणि (मला) व्याकुळ करतो' हे या ओळींचे रूढ व्याकरणनिष्ठ गद्य विधान होईल. मात्र कवितेच्या ओळींतील शब्दांच्या जागा आणि गद्य विधान यांची तुलना केली की कवीने रूढ वाक्यरचना-क्रमापासून कशी मुक्ती घेतली आहे, हे कळते. भाव-परिणामासाठी कवीने (हेतुत: वा अजाणता) केलेली व्याकरणहानी अशी सांगता येईल :

१. क्रियापद शेवटी असते; ते आरंभी आणले.
२. मराठी वाक्यात क्रियाविशेषण क्रियापदापूर्वी येते. येथे ते (व्याकुळ) क्रियापदानंतर ठेवले आहे.
३. मराठीत विशेषण हे नामापूर्वी पण नामास जोडून येते. येथे 'अभंग' या नामाचे 'आर्त' हे विशेषण नामाबरोवर न ठेवता खूप अलीकडे ओढून घेतले आहे.
४. 'जो' हे सर्वनामही नामापूर्वी न येता थोडे अलीकडेच आले आहे. (हीच गोष्ट 'मला' ह्या सर्वनामिक रूपाची)
५. 'ऐकविलास' हे क्रियापद वाक्याच्या थेट शेवटी असायला हवे; ते थोडे अगोदर आले आहे.
६. 'अभंग' हे नाम क्रियापदाच्या अगोदर, खरे तर वाक्याच्या प्रारंभभागात हवे, ते थेट शेवटी घेतले आहे.

म्हणजे आपल्या असे लक्षात येईल की वाक्यरचनेबाबतच्या मराठी व्याकरणनियमांची कुसुमाग्रजांनी पार मोडतोड केली आहे; इतकी की 'परि' हे अव्यय वगळता येथील एकही शब्द व्याकरणाने नेमून दिलेल्या जागेवर आलेला नाही. पण त्यामुळे अर्थहानीही झालेली नाही; उलट फार मोठा भावपरिणाम साधला गेला आहे.

*आधुनिक भाषाविज्ञानाच्या दृष्टीने विचार करता -*
*तू आर्त मला जो ऐकविलास अभंग*

हा एकच एक नामपदबंध आहे आणि तो 'तू मला जो आर्त अभंग ऐकविलास' या वाक्यांशाच्या अर्थापेक्षा वेगळाच भाव-अर्थ सांगणारा आहे. येथील 'तू' आणि 'मला' ही सार्वनामिक रूपे काहीएक प्रयोजनांसह आलेली आहेत, हे त्यांच्या क्रमविशिष्टतेमुळे जाणवते-

१. तू - मला अभंग ऐकविणारी खास तू आहेस; अन्य कोणी व्यक्ती नाही.

२. मला - हा अभंग खास माझ्यासाठी आहे, अन्य कोणासाठी नाही.

हीच गोष्ट येथील 'आर्त' (गुणविशेष) व 'जो' (सार्वजनिक विशेषण) या दोन विशेषणांबाबत सांगता येईल. जो अभंग ऐकविला गेला त्याचे विशिष्टत्व या दोन विशेषणांनी खास अधोरेखित केले जाते. तो अभंग वाट्टेल तो अभंग नव्हता. त्यामागे प्रेयसीचे गंभीर, कदाचित संचित मन दडलेले असावे, असा तो अभंग होता, इत्यादी स्वरूपाची जाणीव आपल्याला होत राहते.

अगोदर म्हटल्याप्रमाणे वरील दोन ओळीतील आरंभीचे 'परि' हे पद वगळता कोणतेही पद मराठी व्याकरण नियमांनी नेमून दिलेल्या जागेवर नाही. (मात्र ही सर्व पदे व्याकरणनियमानुसारच सिद्ध झालेली आहेत, हेही मुद्दाम ध्यानात घ्यायचे.) मात्र केवळ त्या पदांची जागा बदलल्याने ती अपेक्षित काव्यपरिणाम साधू शकली आहेत. अनुभूतीच्या भावनाकरिता कवी जेव्हा शब्दांची संरचना करतो, तेव्हा तो भाषेच्या रूढ व्याकरणाकडे लक्ष देत नाही, तो असा.

कवितेतील शब्द शब्दकोशात दिलेल्या सीमित किंवा बंदिस्त अर्थाने येत नसतो. कवी आपली सर्व ताकद त्यात ओततो, आणि तो शब्द भावदृष्ट्या प्रसरणशील बनवितो.

उदाहरणार्थ -

*वेहोष चढे जलशांना येथील रंग*
*रुणझुणता नूपुर जीव बने नि:संग*












येथील 'नि:संग' हा शब्द पाहावा. हा शब्द येथे शब्दकोशातील अर्थापेक्षा वेगळ्याच अर्थाने आला आहे. 'बेफिकीरी' किंवा 'बेपर्वाई' असा त्याचा येथील अर्थ भावतो. अर्थातच 'कामातुराणां न भयं न लज्जा' या उक्तीतून सूचित होणाऱ्या बेफिकिरीपर्यंत ह्या शब्दाचा अर्थ प्रसरण पावत जातो. पण याहीपेक्षा लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे अगोदरच्या ओळीत येणारा 'बेहोष' हा शब्द 'नि:संग' या शब्दाच्या अर्थक्षेत्राचे नियंत्रण करतो. (किंवा दिग्दर्शित करतो, असेही म्हणता येईल.) या दोन ओळी एकत्र वाचताना भोगाची चढत जाणारी झिंग (आणि त्याच्या परिणामी विलासी व्यक्तीचा दरेक क्षणी सुटत जाणारा विवेक जाणवत राहण्यासारखी परिस्थिती निर्माण होते.

काही काही शब्दांचे सहनिवासी भावार्थप्रदेश असतात. हे भावार्थ रसिकमनात जागृत करण्याचीही किमया कवी करीतच असतो. उदाहरणार्थ ––

'तो नदीकिनारा आणि भंगला घाट !'

ही ओळ पाहा. 'नदीकिनारा' हे प्रियकर-प्रेयसींचे मीलनाचे संकेत स्थळ आहे. पण त्यापुढे येणाऱ्या 'भंगला घाट' या शब्दबंधामुळे येथील मीलन हे चोरटे, ओरबाडणारे शारीर सुख घेऊ पाहणारे मीलन नसणार हे जाणवते. कारण साधारणत: नदीला घाट बांधला जातो, तो जेथे देवालय असेल तेथे. त्यामुळे येथे घाट म्हणताच देवालयाची आठवण होते व परिणामी प्रेमातील पावित्र्याचे सूचन होते. परत हा घाट भंगलेला आहे. त्यामुळे येथे लोकांची फारशी ये-जा, वर्दळ नसणार. प्रियकर-प्रेयसींना हवा असणारा पुरेसा एकांतही इथे असणार. कदाचित पडझड झालेल्या देवळातल्या देवाच्या साक्षीने या भंगलेल्या घाटावर प्रियकर-प्रेयसींच्या काही आणाभाका झाल्या असणार. त्यांचीच स्मृती भोवती हेलावणारा अफाट सागर आणि त्याच्या किनाऱ्यावरच्या श्रीमान् इमारतींचा थाट पाहताना प्रियकराच्या मनात दाटत असणार.

'स्मृती' या कवितेचा शैलीच्या अंगाने असा आणखीही आस्वाद घेता येण्यासारखा आहे. येथे केवळ नमुन्यादाखल थोडक्या गोष्टी नमूद केलेल्या आहेत. 'आशय आणि आविष्कार यांच्या सहजसंवादामुळे या कवितेला अवीट गोडी लाभली आहे.' अशा शब्दात कविवर्य वा. भ. बोरकरांनीही 'स्मृती' या कवितेचा गौरव केला आहे.[४]

जाता जाता आणखी एका गोष्टीचा निर्देश मुद्दाम करावासा वाटतो. कुसुमाग्रजांना अभिजाततेचे, अभिजात मूल्यांचे एक आकर्षण आहे आणि म्हणूनच प्रेमातील अविचल, अव्यभिचारी निष्ठा हे पुरातन मूल्य गृहीत धरून त्यांनी आपली प्रेमकविता लिहिली आहे, असा एक आक्षेप घेतला जातो. या संदर्भात असे म्हणावेसे वाटते की अशा मूल्यांशी पूर्वपरिचित असणाऱ्या रसिकांपर्यंत 'स्मृती'सारख्या कवितेतून प्रेमातील सात्त्विक, अव्यभिचारी निष्ठेचे मूल्य येऊन पोहोचते, हे खरे. पण केवळ या मूल्याच्या दिग्दर्शनासाठी कुसुमाग्रजांनी ही कविता लिहिली असेही म्हणता येणार नाही. कारण तसे जर असते तर शेक्सपीयरप्रमाणेच कवी कुसुमाग्रजदेखील Love is not love, which alters, alteration when it finds सारखा निष्कर्षार्थ काढत राहिले असते. 'स्मृती'त (आणि 'पृथ्वीचे प्रेमगीत' मध्येही) असे निष्कर्षार्थ नाहीत आणि मूल्यशोधनही नाही. 'विशाखा' तील एकूणच सारी कविता ही घटनाप्रधान आहे,

हे येथे मुद्दाम ध्यानात घ्यावयाचे (वारा तडतडा शीड फाडत असतो, हिमलाट पहाटे जगावर येत असते, रात्रिंचर रडत-भेकत असतात, मंथर नाग वळसे घालीत जात असतो, इत्यादी इत्यादी.) कुसुमाग्रज काही घटनांना काव्यरूप देतात आणि त्याद्वारे रसिकमनात भावजागरण करतात. 'स्मृती'त असेच एक भावजागरण केले गेले अहे. अव्यभिचारी, सात्त्विक, नैष्ठिक प्रीतीमूल्यापेक्षाही या कवितेत (आणि 'पृथ्वीचे प्रेमगीत' याही कवितेत) कुसुमाग्रज आपल्या प्रेमात अविचल अन सत्त्वशील राहणाऱ्या प्रियकर-प्रेयसीचे एक निरंग, तात्त्विक नव्हे तर सांग दार्शनिक चित्र रेखाटतात. अशा एका अनोख्या चित्रामुळेच स्मृती ही त्यांची कविता मनोज्ञ झाली आहे.

## संदर्भ


१. ह्या कवितेचे लेखन-स्थळच मुंबई आहे, हे येथे मुद्दाम ध्यानात घ्यावे.

२. द. भि. कुलकर्णी, 'कुसुमाग्रज', दुसरी परंपरा, नागपूर, १९७४, पृ. ९१.

3. Rene Wellek and Austin Warren, Theory of Literature, Penguin Books, Harmondsworth, 1963, P. 249

४. बा. भ. बोरकर, 'टीपा', रसयात्रा, (संपादक - बोरकर-वैद्य), पुणे, १९६९, पृ. १८६.


□□


डॉ. दत्तात्रेय पुंडे, ४/९ अर्चनानगर, एरंडवणे, पुणे ४११ ०३८.


---

**म. सा. परिषद नवे आजीव सभासद** (अंबरनाथ शाखा)

जगताप निशा चंद्रकांत, अंबरनाथ
कुलकर्णी श्वेता दिलीप, अंबरनाथ
जोशी सुषमा किरण, अंबरनाथ
मोकाशी वरिता नरहर, अंबरनाथ
तेली अवधूत पुरुषोत्तम, अंबरनाथ
सुभेदार यशवंत नीळकंठ, अंबरनाथ
खरे माधवी विजय, अंबरनाथ
देशपांडे अरुण नारायण, अंबरनाथ
निंबवीकर सुलोचना शरद, अंबरनाथ
वझे अनिता गजानन, अंबरनाथ
गोखले सुचेता अरविंद, अंबरनाथ
भावे उषा गोविंद, अंबरनाथ
गांगल राजन विठ्ठल, अंबरनाथ
देशपांडे परिणिता पांडुरंग, अंबरनाथ
साठे सुचेता श्रीपती, अंबरनाथ
साठे श्रीपती परशुराम, अंबरनाथ
लेले राकेश श्रीकांत, अंबरनाथ
देशपांडे चैत्राली चंद्रसेन, अंबरनाथ
पाध्ये सुषमा मिलींद, अंबरनाथ
लेले प्रभाकर पुरुषोत्तम, अंबरनाथ
सावळे शैलजा मधुकर, अंबरनाथ
जोशी नीला चंद्रकांत, अंबरनाथ
खरपडे कल्पना लक्ष्मण, अंबरनाथ
अष्टपुत्रे पूर्वा प्रमोद, अंबरनाथ
जोशी लीला रामचंद्र, अंबरनाथ
पाटील महेंद्र रघुनाथ, अंबरनाथ
सरवदे सुधाकर गोविंद, अंबरनाथ
गुणे सुधा शरद, अंबरनाथ
गुणे शरद महादेव, अंबरनाथ
पाचपुते ज्ञानेश्वर कोंडाजी, अंबरनाथ
जोशी अनिता प्रकाश, अंबरनाथ
भंडारी चंद्रकांत प्र., अंबरनाथ

प्रा. डॉ. महादेव देशमुख

# मराठी भेदिक कवितेतील ऐकिवाचे स्वरूप

वरील शीर्षकाचा लोकसाहित्यात भर घालणारा विद्यापीठीय पातळीवरील प्रबंध नुकताच शिवाजी विद्यापीठाने मान्य केला व प्रस्तुत लेखकास 'डॉक्टरेट' ही पदवी मिळाली. प्रबंध लेखनामागील भूमिका काय आहे हे समजावून सांगण्याच्या हेतूने मी थोडक्यात विवेचन करतो.

लोकसाहित्याचे जे क्षेत्रीय कार्य असते त्या अनुषंगाने हस्तलिखित सामग्री संकलित करून त्याची रूपरेषा व मांडणी केलेली आहे व प्रबंध अभ्यासाच्या सोयीसाठी पाच प्रकरणात विभागलेला आहे. लोकसाहित्यामध्ये लोककथा, लोकगीत, उखाणे, म्हणी, लोकोक्ती, लोककथागीत, लौकिककथा, लोककला, विधी, रुढी, परंपरा, समजुती यांचा समावेश होतो. त्यापैकी प्रयोगसिद्ध लोककलाप्रकार याचा तपशीलाने अभ्यास पहिल्या प्रकरणात मांडलेला आहे. उदा. गोंधळ, वाघ्या-मुरळीचे जागरण, धनगराची गाणी, पोतराजाची गाणी ह्याचा धार्मिक विधीमध्ये समावेश केला जातो. याशिवाय वासुदेवाची गाणी, भराडाची गाणी, डहाकाची गाणी, विदर्भातील दंडाराची गाणी, मराठवाड्यातील कानबाईचा उत्सव, महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात फिरणारा बहुरूपी, कोकणभागातला दशावतार इत्यादी लोककलाप्रकारांची परंपरा व त्याच्या सादरीकरणाचे स्वरूप याचा तपशीलाने आढावा घेतला आहे. या सर्व लोककलाप्रकाराचे आणि भेदिक फडाचे नाते जवळचे असावे असा संबंध जोडलेला आहे, याचाही मागोवा घेऊन त्यातील साधर्म्य तपासून पाहिले. प्रबंधाच्या दुसऱ्या प्रकरणात 'भेदिक' या संज्ञेचा अर्थ व व्युत्पत्ती सांगितली. भेदिक कवितेला - भेदिक फड यालाच कलगीतुरा, शिवशक्तीचा झगडा, याशिवाय ब्रह्मगाथा असेही संबोधले जाते. यामध्ये कलगीपक्ष व तुरापक्ष असे दोन पक्ष असतात. लोक साहित्याचे अभ्यासक डॉ. प्रभाकर मांडे हे आध्यात्मिक कविता असे म्हणतात, तर रा. चिं. ढेरे कलगीतुरा याची उकल केरळमधील तर्याट्टमशी संबंध जोडून स्पष्ट करतात. म्हणूनच ही परंपरा कर्नाटक, केरळ या प्रांतातून महाराष्ट्रात आली असावी असे अनुमान करता येते. कर्नाटकामध्ये शिवाचे



अनुक्रमणिका



**प्रा. डॉ. महादेव देशमुख** हे संगमेश्वर कॉलेज, सोलापूर येथे मराठीचे प्राध्यापक आहेत. त्यांनी दयानंद महाविद्यालयात बी. ए. आणि शिवाजी विद्यापीठात एम. ए. केले. बी. ए. आणि एम. ए. ला प्रथम श्रेणी प्रथम क्रमांक मिळविला आहे. त्यांना अनेक पारितोषिके मिळालेली आहेत. एम. ए. ला कवी माधव जूलियन, उमागिरीश, पु. भा. भावे पारितोषिक ही त्यातली अत्यंत महत्त्वाची पारितोषिके आहेत. त्यांच्या 'मराठी भेदिक कवितेतील ऐकिवाचे स्वरूप' या विषयावरील प्रबंधास (शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर) नुकतीच मान्यता मिळून त्यांना पीएच.डी. पदवी मिळाली आहे.

(शैव) उपासक अधिक प्रमाणात आढळतात. कर्नाटकात भेदिक फडात स्त्रीशाहीरांचा प्रवेश आजही आढळतो. महाराष्ट्रात मात्र भेदिक फडाचे प्रेक्षक म्हणूनही स्त्रियांचा वावर दिसत नाही. भेदिक फडात (गण) चढाची लावणी, उताराची लावणी (गुरुमार्ग, समाधीमार्ग, भक्तिमार्ग) याला गार्गाची कविता असेही म्हणतात. गवळण, साकी (नरदेह) ध्यायाची पदे (गर्भावलीची लावणी), भेदिक चवसर, वीरकंगण-टोणपे या रचना पूर्वरंगात सादर करतात, तर उत्तररंगात ऐकिव नावाची रचना सादर करतात. ही रचना गद्यपद्यमिश्रित स्वरूपाची असते. तीन ते चार तास चालेल इतके कथानक असते. भेदिक कवितेमध्ये कूटरचना असतात, त्यामध्ये गूढाची उकल अपेक्षित असते. महिनेन् महिने याची उत्तरे सापडत नसतात, तेव्हा पराजित शाहीराला शरण म्हणून सगळी वाद्ये जेत्या शाहीराला द्यावी लागतात, अशी प्रथा आहे. याला सवाल-जबाब म्हणून संबोधले जाते. कूटे, पदे, यक्षप्रश्न अशा स्वरूपाची ही भेदिक कविता लोकप्रिय तमाशात ह्या रचना सवाल-जबावाच्या माध्यमातून सादर केल्या जातात, हे नमूद करावेसे वाटते.

भेदिक फडातील उत्तररंगातील ऐकीव ही रचना सादर केली जाते. तिचे 'गेय' असे स्वरूप असते. फडात डफ, तुणतुणे, ढोलकी, टाळ, वाजापेटी इत्यादी वाद्यांचा वापर असतो. याच्या साह्यानेच नृत्य, नाट्य, संगीत तयार होते. ऐकीवामध्ये पौराणिक, चरित्रात्मक, लोककथात्मक व सामाजिक असे विषय असतात. विषयाच्या वर्गीकरणानुसार तिसऱ्या प्रकरणात अभ्यास मांडला आहे.

भारतामध्ये प्राचीन कालापासूनच लोकगीते व लोककथा सादर करण्याची परंपरा होती. कथागीतही त्याच स्वरूपाचे आहे. म. ना. सहस्रबुद्धे याला 'कथाकवन' म्हणतात. रा. चिं. ढेरे व प्रभाकर मांडे यांनीही या मताला दुजोरा दिला आहे. ऐकीव ही दीर्घ कथात्मक रचना. तिचे मौखिक साभिनय असे स्वरूप. ऐकीव या शब्दाचा अर्थ द. ह. अग्निहोत्री पुढीलप्रमाणे

देतात.

ऐकीव - आकीय (म. ऐकणे)

(वि.) ऐकलेले

- प्रत्यक्ष पुरावा नसलेले

- ऐकलेल्या गोष्टीचा आधार

ऐकीव ही रचना का सादर केली जाते, याविषयी व्यंकटेश माडगूळकर म्हणतात, 'श्रोत्यांना सतत गंभीर विषय ऐकून चालत नाही. त्यांना अधूनमधून हलकंफुलकंही द्यावं लागतं. म्हणजेच श्रोत्यांच्या मनावरील ताण कमी होतो. श्रोत्यांना आध्यात्मिक विषय गंभीर व कंटाळवाणा वाटत असतो.' ऐकिवाचे संकलन करून त्याचे वर्गीकरण केलेले आहे व कथेतील समान घटकांचा शोध घेतला यालाच 'मोटीक' असे म्हणतात. मराठीत कल्पनाबंध असेही म्हणतात. उदा. स्वप्नाचा कल्पनाबंध, साहस व पराक्रमाचा कल्पनाबंध, चमत्काराचा कल्पनाबंध, मृत-जिवंताचा कल्पनाबंध, देवाचे मानवांना सहाय्याचा कल्पनाबंध इत्यादी ऐकिवाचे स्वरूप त्यातील कल्पनाबंध याचा विचार केलेला आहे. अशा गद्य-पद्यमिश्रित कथेवरून तमाशातील वर्गाची जडणघडण झालेली आहे, हे सकृतदर्शनी म्हटले आहे.

प्रबंधाच्या चौथ्या प्रकरणात भेदिक फडातील रचना आणि तमाशाचा उगम व त्यातील घटकांचे साधर्म्य शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. भेदिक फडात फक्त अध्यात्मविषय असतो तो कंटाळवाणा व गंभीर तत्त्वज्ञानावर आधारलेला असतो. उदा. वेद, शास्त्र, उपनिषद, पुराण इत्यादी म्हणून हा भेदिक तमाशामागे पडून रंगीत तमाशाचा जन्म झाला. ह्यामध्ये भडक व शृंगाराला महत्त्व दिलेले असते. हा पेशवेकालीन तमाशा म्हणूनही ओळखला जातो. या तमाशात गण, गवळण, लावणी, भेदिक कूटे (सवाल-जबाब) या रचनाबरोबर विविध पात्रांचाही समावेष झालेला आहे. उदा. पुढारी, ढोलक्या, कडे वाजविणारा, सोंगाड्या, शिलकरी, नाच्यापोऱ्या इत्यादी. तमाशातील 'सोंगाड्या' हे पात्र आकर्षक ठरले. त्याला तमाशातील 'वाहशाह' म्हणून ओळखले जाते. आपल्या विक्षिप्त हालचाली, हजरजबावीवृत्ती, शव्दकौशल्य इत्यादी गुणांमुळे तो प्रेक्षकांना नेहेमी हसवीत राहतो. याच तमाशात नाच्यापोऱ्या हेही पात्र आकर्षणाचेच ठरले. हा नाच्यापोऱ्या १२ ते १४ वयोगटातील असून तो स्त्रीसुलभ हावभाव करणारा असतो. एकूणच स्त्रीची भूमिका करीत असतो. त्यामुळे या तमाशाकडे प्रेक्षक आकर्षित झाला. पुढे वगाच्या तमाशात गण, गवळण, लावणी, सवाल-जबाब या घटकांबरोबरच वगाचीही भर पडली त्यामुळे वगाचा तमाशा म्हणून ओळखला जाऊ लागला. याआधी बतावणी ही रचना फार्सवरून या तमाशात रुढ झाली. भेदिक फडातील ऐकीव आणि तमाशातील वग यात साम्य आढळते. वगाची संहिता गद्यस्वरूपाची असते. पात्राची संख्या साधारण आठ ते दहा असते. संवादरूपात हे कथानक सांगितले जाते. म्हणजेच भेदिक फडातील रचनांवरून लोकप्रिय तमाशाची जडणघडण झाली आहे. किंवहुना भेदिक फडातील ऐकिवावरूनच वगाचीही जडणघडण झालेली आहे. हे नि:संदिग्धपणे म्हटले आहे. भेदिक शाहीर नागनाथ केशव पारनेरकर यांची 'छेल बटाऊ मोहनाराणीची लावणी' ह्या रचनेवरूनच उमाबाबूंचा मोहनाबटाव



अनुक्रमणिका






हा वग वेतलेला आहे, हे ठामपणे सांगता येईल इतके साधर्म्य आहे.

□□

प्रा. महादेव देशमुख, एम.ए.,पीएच.डी.,
अधिव्याख्याता, मराठी विभाग, संगमेश्वर कॉलेज, सोलापूर

---

## नवती महोत्सवासाठी मिळालेल्या देणग्या

| | |
|---|---|
| श्री. यशवंत भास्कर दीक्षित | रु. ५००/- |
| कार्याध्यक्ष, मराठी प्रकाशक परिषद, पुणे | रु. ११००/- |
| डॉ. म. वि. गोखले | रु. १०९०/- |
| कार्याध्यक्ष, मराठी प्रकाशक परिषद, पुणे | रु. १०००/- |
| श्री. ब. का. विप्रदास, पुणे ४ | रु. १०१/- |
| श्रीमती हेमा लेले, पुणे | रु. १०००/- |
| श्रीमती क्षीरसागर शकुंतला, पुणे | रु. २५१/- |
| श्रीमती दामोदर काशिनाथ कुलकर्णी, पुणे १६ | रु. १००१/- |
| श्री. गजानन वामन वेरी, पुणे | रु. ५१/- |
| श्रीमती कोल्हटकर उषादेवी विजय, न्यूयॉर्क | रु. ३५१०/- |
| डॉ. शांता नोबल, न्यूयॉर्क | रु. ३५१०/- |
| श्री. सुगंध साळवी, न्यूयॉर्क | रु. ५२५/- |
| श्रीमती अलका दीपक रणदिवे, न्यूयॉर्क | रु. ८७५/- |
| श्रीमत येरवडेकर सुषमा प्रकाश, न्यूयॉर्क | रु. ८७५/- |
| श्रीमती बापट कल्पना शाम, न्यूयॉर्क | रु. ७०५/- |
| विश्वस्त श्री ज्ञानेश्वर महाराज संस्था, आळंदी देवाची | रु. १०,००१/- |
| श्री. व सौ. मोडक, न्यूयॉर्क | डॉलर्स २०/- |
| श्रीमती कमलाताई भट, पुणे | रु. १०१/- |
| श्रीमती लीलाताई भागवत, पुणे | रु. १०१/- |
| श्रीमती विमलाताई भिडे, पुणे | रु. १०१/- |
| श्री. होनप विश्वनाथ नारायण | रु. १००/- |
| श्री. ह. मो. मराठे, पुणे | रु. १००/- |
| श्री. सदा डुंबरे, पुणे | रु. १०००/- |
| श्रीमती वसुंधरा दिंडोरकर, सोलापूर | रु. १०१/- |
| श्रीमती पद्मजा पाध्ये, पुणे ३८ | रु. ५०१/- |
| श्री. शरदशेठ गंगाराम दोशी, फलटण | रु. १०००/- |
| श्री. शिवाजीराव घोरपडे | रु. १५१/- |
| डॉ. सुधाकर के. भोसले | रु. ५००/- |
| प्रीती व तमन्ना रणदिवे, न्यूयॉर्क | डॉलर्स १५/- |
| श्री. रा. ना. दांडेकर, पुणे | रु. ९०००/- |

दि. १३।५।९७ पर्यंत

डॉ. श्रीरंग संगोराम

# प्रभाकर जठारांची शैलीदार संगीत समीक्षा

'स्वरसौहार्द' हे, मा. दीनानाथांचे शिष्य डॉ. प्रभाकर जठार (संगीत प्रवीण) यांच्या १९७० ते (अंदाजे) ८४ पर्यंतच्या मासिके, वृत्तपत्रे, स्मरणिका इत्यादींमधील संगीत कलाकारांवरील लेखांचे संकलनात्मक पुस्तक असले तरी ते कलाकारांबद्दलचा चारित्रिक तपशील, संगीतास्वादन व संगीत समीक्षा या दृष्टींनी संगीत साधक व सामान्य रसिक या सर्वांनाही आवडेल व उपयुक्त वाटेल असे आहे. या लेखनाचे एक लक्षणीय वैशिष्ट्य हे की भाषिक अभिव्यक्तीच्या दृष्टीने ते खूपच 'संपन्न' आहे. या सर्व लेखांचे उद्दिष्ट सांगीतिक व्यक्तिमत्त्वाचे उद्घाटन हे असले तरी त्यामागे लेखकाची संशोधनात्मक व चिकित्सक अशी जिज्ञासू वृत्ती अनुप्रेरक म्हणून उभी आहे. मुंबईतील वास्तव्यामुळे जठारांना १९३८-४० पासून तेथील संगीत दुनियेशी संलग्न राहण्याची सुविधा मिळालेली. शिवाय घरातील संगीताचे संस्कार आणि त्याचबरोबर उच्चशिक्षित रसग्राही वृत्ती आणि अभिव्यक्तिकौशल्य या सर्वांचा 'प्रसाद' या पुस्तकातून प्रकटलेला आहे. अर्थात् हेही खरे की सर्व लेख सारख्याच 'उंचीवरून' आलेले नाहीत. स्मरणिकांमधील किंवा वृत्तपत्र पुरवणीमधील लेखांना मर्यादा पडणारच. तथापि त्यातही एखादा सुखकारक सांगीतिक बिंदू येऊन गेलेला आहेच. पुस्तकाचे आणखी एक वैशिष्ट्य 'पॉप्युलर'ची उत्कृष्ट, मुद्रणदोषरहित, व्यक्तिमत्त्व खुलवणाऱ्या बोलक्या छायाचित्रांसह झालेली दर्जेदार ग्रंथनिर्मिती हेही आहे.

प्रस्तुत लघुपरीक्षणातून पुस्तकातील सर्व २२ कलाकारांसंबंधीच्या लेखनाबद्दल उलगडून सांगणे अशक्य आहे. शिवाय भास्करबुवा बखले, थिरकवा यांच्यासंबंधी आत्मप्रत्ययाने काही सांगणे शक्यही नव्हते. प्रो. बी. आर. देवधर, कुमार गंधर्व, वसंतराव देशपांडे या तीन महनीयांवर जठारांनी मनसोक्त लिहिले आहे. नंतर मा. कृष्णराव, छोटा गंधर्व, पं. जसराज, निवृत्तिबुवा सरनाईक, शोभा गुर्टू यांचा क्रम लागतो. उरलेल्यांमध्ये यशवंतबुवा जोशी, दिनकर काराकिणी, जितेंद्र अभिषकी, प्रभा अत्रे, परवीन सुलताना, रामनारायण (सारंगी), डी. के.

दातार (व्हायोलिन) इत्यादींवरील नैमित्तिक लेख आहेत. प्रत्येक लेखाची सुरुवात आगळी, चटकदार आणि पकड घेणारी आहे. उपमा-उत्प्रेक्षांचा आधार न घेता प्रतिमात्म ढंगाने अमूर्त संगीताविष्काराची प्रचीती मिळवून देणारे हे लेखन आहे. थोडक्यात या संगीतसमीक्षेला वाङ्मयीन गुणवत्तेची किनार लाभली आहे. कुमार हे 'अनकन्व्हेन्शनल' गायक आहेत, छोटा गंधर्व हे 'आउटलँडिश' कलाकार आहेत, अशी (इंग्रजी असली तरी) चपखल विशेषणे ते योजतात. परवीन सुलताना 'मुद्राराक्षस' होऊ न देता प्रसन्नपणे गायन मांडते, 'स्वरलीनता' हा प्रभा अत्रे यांच्या गायनाचा स्वभाव आहे, अशी अन्वर्थक शब्दयोजना ते करतात.

या पुस्तकातील लेखांमध्ये जठारांनी एक खास सूत्र अवलंबिलेले दिसते. त्यांनी सर्वांसाठी परवलीचे काही प्रश्न आधी मनात योजलेले आहेत. त्यानुसार त्या त्या कलाकार वा सांगीतिकांनी या प्रश्नांना जी अनुभवसिद्ध उत्तरे दिली आहेत, ती एकंदर संगीतविचारात भर टाकणारी आहेत. या दृष्टीने हा या पुस्तकातील सर्वात बहुमोल भाग ठरावा. त्याची थोडीशी वानगी अशी : (१) वसंतराव देशपांड्यांना विचारले की, तीन मिनिटात जर लता तीन तासांच्या बैठकीचा आनंद देत असेल तर आजच्या गतिमान युगात शास्त्रीय संगीताची गरज काय? वसंतराव ताडकन उत्तर देतात, ''तीन मिनिटात सिद्धांत होऊ शकत नाही, तो केवळ आनंद आहे.'' (२) कुमार सांगतात - ''साडेसहा मात्रांचा ताल वगैरे अभ्यास आहे, तो ताल नाही.'' (३) निवृत्तिबुवा म्हणतात - ''बालगंधर्व गवयांचे बाप होते. त्यांनी सर्वांना खूप आनंद दिला. पण स्वत: त्यांनी तो त्या प्रमाणात घेतला नाही. दीनानाथ स्वत: आनंद घेत. ते कलावंत गायक होते. '' (४) राग नुसते नवीन असून उपयोगी नाही, त्याचे कायदेही बांधले गेले पाहिजेत. (छोटा गंधर्व) (५) चिजेचा अर्थ स्पष्ट होत नसेल तर ती चीज कितीही खानदानी व पारंपारिक असली तरी मी गाणार नाही. (जसराज)

या सर्व लेखात कलाकाराच्या कलेचे विश्लेषण सर्वोत्तमपणे जे झाले आहे, ते कुमारांवरील २८ पृष्ठे व्यापलेल्या पाच लेखांमधून हे विश्लेषण अत्यंत प्रत्ययकारी व अंतरीच्या जाणकारीने झालेले आहे. तितक्या प्रमाणात मा. कृष्णरावांसंबंधीचे विवेचन (लेखकास तेवढा सहवास लाभूनही) का होऊ शकले नाही, नकळे. कुमारांसंबंधीचे एक उदाहरण ''त्याच्या रागसंगीतातील गाभा भावसंगीत हा असतो. तो चिजेतील शब्दांना अपेक्षित भावांचे कुरळ (छान शब्द!) देऊन राग विस्तार करतो. तेथे फालतूपणा, धंदेवाईकपणा वा खोटेपणा नसतो. आपण सर्वांनी मिळून एका दिव्य आनंदाचा शोध घ्यायचा आहे, हा भाव असतो. लयीचे आंतरिक साक्षात्कार दणक्याने टाकलेली वेगवान तान...'' उपशास्त्रक्षय गायिका श्रीमती शोभा गुर्टूबद्दल ते लिहितात, '' ख्याल त्यांना गावा लागतो, ठुमरी त्यांच्या गळ्यातून सहज येते.'' एकंदरीत 'स्वरसौहार्द'मधून पानोपानी असे गानरसलुब्धतेचे 'कणस्वर' विखुरलेले आहेत.

पुस्तकाचे परिशीलन करताना हे जाणवते की लेखकाचे मन दीनानाथ, लताजी, कुमार आणि बालगंधर्व यांच्यात आदर्शपणे गुंतलेले आहे. त्यांची पारस्परिक तुलना करीत त्यांचा 'प्रताप आठवावा' याची ओढ लेखकाला विशेष आहे. यातून 'दोन गंधर्व आणि एक दीनानाथ' व 'कुमार आणि लता' हे लेख निर्माण झाले आहेत. या संदर्भात हे नोंदवणे आवश्यक वाटते

की या लेखांमधील विचारसरणीला हौशीपणाची बैठक जितकी आहे, तितकी कलाविषयक साक्षेपाची आणि तार्किकतेची नाही. ज्या परिस्थितीत लताजींना त्या परधनी संगीताच्या मोहमयी दुनियेत प्रवेश करावा लागला त्याकडे दुर्लक्ष करून त्या शास्त्रीय संगीतात सरसावल्या नाहीत. यावर अश्रू ढाळण्यात काय अर्थ आहे? आणि लताजी त्या क्षेत्रात 'एव्हरेस्ट'ला पोचल्या त्याचे काय? लता आणि कुमार यांची संगीतक्षेत्रे सर्वथा वेगळी असताना या तुलनेचा अट्टाहास कशाला? जाता-जाता आणखी एक मुद्दा कुमारांच्या तांबेगीत गायनाबद्दल. भावगीत रागसंगीतातून पोचविण्याचा कुमारांचा प्रयत्न जठारांना पटलेला आहे. ते सम्यक परिणामावर बोट ठेवताना आणि बैठकीतल्या गोष्टी भावगीताच्या रागविस्तारात आणल्याबद्दल त्यांची प्रशंसा करतात. एका शब्दात हा सर्व वैचारिक वकीलीपणा आहे. त्याबद्दल काय बोलायचे?

'स्वरसौहार्द'मधील लेख मुळाप्रमाणेच छापल्यामुळे त्यात बरीत खटकणारी कालबाह्यता आलेली आहे. उदाहरणार्थ, अभिषेकींची लोणावळा येथील प्रॉपर्टी आता इतिहासजमा झाली आहे. लेखनसमयीच्या २३ वर्षीय परवीन सुलतानांनी आता दिलशादखाँ यांच्याशी विवाह केला असून आपले गायन अनेक अंगांनी समृद्ध केले आहे. आणखी एक खटकणारी गोष्ट अशी की पुस्तकातील बहुतेक सर्व हिंदी बंदिशींचे शब्द चुकीचे छापले आहेत आणि हा प्रमाद केवळ मुद्रितशोधकाचा नक्कीच नाही. दोन उदाहरणे - (१) 'सैया निकसी गये मैना लडी।' (पृ. १०४) या ऐवजी 'सैंया निकस गए मैं ना लडी।' (मी अडवले नाही) असे पाहिजे. (२) 'मारोजी भुलोना माने' (पृ. १९५). 'मारूजी भूलो ना म्हाने' असे पाहिजे. मारू म्हणजे प्रियकर. 'मारोजी' याचा अर्थ काय होईल? 'म्हाने' या राजस्थानी हिंदी शब्दाचा अर्थ 'मला' असा आहे. हा 'माने' कोण?

प्रस्तुत टीकेचा हा भाग फक्त १५ टक्केच आहे. ८५ टक्के पुस्तकाचे यशच आहे, त्याबद्दल लिहिलेले आहे.

□□

डॉ. श्रीरंग संगोराम, ५१, गणेश मळा, सिंहगड मार्ग, पुणे ३०

*'**स्वरसौहार्द** : लेखक - डॉ. प्रभाकर जठार , प्रकाशक - पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे - २००, मूल्य - १५०/-*

---

**म. सा. परिषद नवे आजीव सभासद** (अंबरनाथ शाखा)

मोकाशी सुचेता, अंबरनाथ
बाडगी प्रमोद माधव, अंबरनाथ
बर्वे सिद्धिविनायक सत्यसंघ, अंबरनाथ
कारखानिस अरविंद द्वारकानाथ, अंबरनाथ
म्हात्रे अजित रामकृष्ण, अंबरनाथ
धर्माधिकारी मधुकर भगवंत, अंबरनाथ
होनाले दीपक, अंबरनाथ
ठकार माधुरी प्रभाकर, अंबरनाथ
शिंदे अभय, अंबरनाथ
गोगटे हेमंत, अंबरनाथ



अनुक्रमणिका

नंदा सुर्वे

# बोधप्रद, संदेशप्रधान, रंजनवादी-'भारुड'



श्री. राजा मंगळवेढेकर

विस्तारत गेलेल्या आपल्या आत्मनिवेदनाला भारुड म्हटलं जाऊ शकतं, मग त्यामध्ये एक उपहासगर्भ छटा येते, असं इतरांकडून होणारं दोषारोपण टाळण्यासाठीं तो धोका सरळ सरळ अंगावर येऊ नये म्हणूनही बचावात्मक पद्धतीनं आपणच त्याला 'भारुड' असं शीर्षक देण्याचा पवित्रा एखाद्या आत्मनिवेदकानं घेतला तर तो तद्दन वाचकनिंदेपासून तर वाचतोच, शिवाय तो गौरवांकितही होऊ शकतो. साक्षेपी आणि बहुमिती लेखक राजा मंगळवेढेकरांचं 'भारुड' नुकतंच साहित्यव्यवहार निर्मितीत विराजित झालं आहे, त्याचा हा संदर्भ आहे.

त्यांनी 'भारुडा'च्या शेवटी समारोपात आत्मगत होताना स्वत:ला 'गोष्टीवेल्हाळ' असंही एक अर्थपूर्ण बिरूद लावून घेतलंय,

त्याची प्रचीती निरंतरपणे येत राहते. गोष्टीवेल्हाळपणा हा जो त्यांचा स्थायीभाव आहे, तो उच्च अभिरुची जपणारा आहे, हेही सातत्यानं लक्षात येतं. त्यातूनच हा गोष्टीवेल्हाळपणा लेखनबद्ध होतो. श्री. मंगळवेढेकरांच्या जीवनपटावर अनेक महनीय व्यक्तित्त्वांचा प्रवेश झालाय. पुढे त्यातल्या बहुतेकांशी त्यांची मैत्री जडलीय. कारण पुस्तकात अनेकदा 'माझे मित्र xxx' असा आत्मभावानं आणि अभिमानानं लेखकानं उल्लेख केलाय.

पंढरपूरसारख्या त्यामानानं अविकसित भागात जन्मलेल्या, वाढलेल्या माणसाला इतके अलौकिक सहवास लाभणं हे नक्कीच आनंददायी आहे. या सहवाससुखाचा त्यांच्या जडणघडणीवर सुपरिणामच होत गेला. कारण, पंढरपूर हे पूर्णपणे धार्मिक वळणाचं गाव. अशा वातावरणात राहूनही लेखकाची वृत्ती काहीशी रुढीविन्मुख झालीय. त्यांचा हा उदारमतवादीपणाकडे कसा कसा प्रवास होत गेला, हे पहाणं फार रंजक आहे.

या गोष्टीवेल्हाळ मंगळवेढेकरांना किस्से निवेदन करण्यातं खूपच रूची. त्यांना ते तंत्रही उत्तम जमलेलं. कोणताही किस्सा खुलवून-फुलवून सांगितला की तो श्रोतृवर्गाला भावतो. त्यांच्या या कौशल्यामुळेच भारावून जाणाऱ्या त्यांच्या स्नेहपरिवारानं त्यांना आत्मचरित्र लिहिण्यासाठी प्रवृत्त केलं. एवढी विलक्षण अनुभवसंपन्नता असणाऱ्या श्री. मंगळवेढेकरांना ते अवघड नक्कीच नव्हतं. आत्मचरित्र थोरामोठ्यांनीच लिहावं हा संकेतही आजकाल मोडला आहे. याचा आधार त्यांच्या संकोचशील मनाला वाटला आणि हे लेखन साकार झाले. (संदर्भ : 'मनोगत')

'म्हटलं तर हे आहे आत्मनिवेदन, म्हटलं तर अनुभवकथन, म्हटलं तर प्रकट चिंतन आणि म्हटलं तर आहे प्रवासी गप्पांगण' असं त्यांनी प्रस्तावनेत म्हटलं आहे. याला आत्मचरित्राचं मोजमाप लावू नये, अशी सूचनाही त्यांनी केली आहे. 'मी आपला गप्पागोष्टीत रमणारा आणि आठवणींच्या गुऱ्हाळात गुंगणारा गोष्टीवेल्हाळ माणूस. अशा माणसानं 'भारुड'च लावलेलं बरं' असं समर्थनाही ते करतात.

'करविली तैसी केली कटकट वाकुडे का नीट देवजाणे' असं तुकोबांप्रमाणे म्हणून कानावर हात ठेवणं उत्तम, असा ते पवित्रा घेतात. आणि मन:पूत लिहित रहातात. अगदी अनावरपणे, उत्कटपणे त्यांची लेखणी भरभरून वहात राहते. कारण लेखनाशी त्यांनी अतूट असं नातंच जोडलेलं आहे. त्याला तसा पूरक संदर्भही आहे. ते मॅट्रिकला असताना त्यांना कोणीतरी विचारलं होतं, पुढे काय करणार? नोकरी का? यावर मंगळवेढेकरांनी उत्तर दिलं होतं, 'नाही. मला लेखक व्हायचंय.' आणि त्यांनी ती स्वयमेच्छा पाळली, जोपासली. टिकवून ठेवली.

स्मरणकाळात फिरता फिरता लहानपणच्या रम्य आठवणी खूप दाटून येतात. कारण तिथपासूनच व्यक्तिमत्त्वाची बीजं पडायला सुरुवात झालेली असते. मंगळवेढेकरांना पंढरीतलं बालपण खूप दाटपणे आठवतं. तिथल्या वास्तव्यात, त्या काळात सान्निध्यात आलेल्या मायेच्या माणसांचं ऋण ते अंत:करणापासून जपतात. आभाळाएवढं मोठं होण्याच्या संकल्पनेमध्ये त्यांनी बराच विहार केला. त्यातूनच -











*मापू जाता पुरेचिना, थिटे पडतसे माप*
*असे विशाल तरीही वाटे आभाळच बाप*

या संदर्भित कवितेचा जन्म झाला. मंगळवेढेकरांची सर्जनात्मक वृत्ती अशी अंकुरायला लागली. लेखक होण्याची आकांक्षा त्यांनी वर्तवली होती, तरी त्यांनी कृत्रिमपणे त्या प्रवाहाला जखडून घेतलं नव्हतं. सहजप्रक्रियेतून समोर येणारे विषय आणि यांची लेखनबद्ध करण्यातली उत्कटता यामुळे हे रसायन चांगलं जमत गेलं. हा पेशा म्हणून पत्करण्याइतकी पोषकताही पुढे-पुढे येत गेली आणि ते या काळ्या-पांढऱ्या जगात रमत गेले. त्याच्याशी अद्वैताचं नातं जोडलं.

त्यांचं लहानपण पंढरपूरच्या ज्या गल्लीत गेलं, त्या गल्लीतल्या आणि तिथल्या माणसांशी निगडित अशा खूप आठवणी त्यांच्या मनात खोलवर रुजलेल्या आहेत. शिक्षणाची तळमळ असणारे गोपाळमास्तर आणि त्यांच्या मुलांची झालेली फरपट लेखकाला सुन्न करते. मास्तरांचे बंधू अण्णा, किसनराव, फुलमामडीकर कुटुंबीय, भागू गौळण, ताठेमास्तर अशी कितीतरी गल्लीकर मंडळी त्यांना तपशीलातून आठवतात. गोपाळदेव म्हणजेच तात्यांच्या आठवणी सांगत असताना लेखकाच्या घडत जाण्याचा आरंभकाळ उभा राहतो. म्हणजे तात्यांची शिस्तप्रियता यांना कशी जाचक होत असे हे सांगताना ते म्हणतात, 'रात्री दहाच्या आत घरात आलं पाहिजे. हा तात्यांचा दंडक होता. रात्री दहानंतर कडी काढली जायची नाही.' आणि त्याच काळात या लोकांच्या डोक्यात राजकीय, सामाजिक चळवळीचं वारं भिनलेलं होतं. त्या मंतरलेल्या दिवसात त्यांना तो नाद लागला होता. त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाची हीच पायाभरणी म्हणायला हवी.

स्वातंत्र्य चळवळीचं वारं सगळ्या भारतभर पसरलं होतं. त्यात त्यांच्या प्रभातफेऱ्या, मेळावे, आंदोलनं चालायची. 'इन्कलाब जिंदाबाद' बरोबरच 'नही रखनी, नहीं रखनी, सरकार जालीम नहीं रखनी' अशा कितीतरी घोषणा पुकारल्या जायच्या. लेखकानं राष्ट्रसेवादलातले अनुभवही खूप आत्मीयतेनं लिहिलेत. तिथे सत्याग्रह, असहकार, स्वदेशी, हरताळ, बहिष्कार अशा वजनदार शब्दांची ओळख झाली. राष्ट्रसेवादलाबाबत लेखक म्हणतात, 'माझ्या जीवनातल्या राजकीय-सामाजिक-सांस्कृतिक धडपडीला सुरुवात शालेय जीवनातच झाली. पण सेवादलाच्या रूपानं एक वेगळीच 'बिनभिंतीची शाळा' मिळाली.

या बिनभिंतीच्या शाळेत त्यांना अनेक मान्यवर व्यक्ती भेटल्या. पुढे त्यांच्याशी स्नेह जडला. कॅपिटल बाँब केस प्रकरणात सूत्रधार असलेल्या शिरुभाऊ लिमयेंचा सहवास त्यांना दीर्घकाळ लाभला. कॅपिटल बाँब कटाची कहाणी खूपच भेदक आहे. भाल वायाळ हा शिरुभाऊंच्या या कटातला भक्कम सहकारी. पण त्याला फोडण्यात आलं आणि माफीचा साक्षीदार करण्यात आलं. त्यामुळे त्याचा मार थांबला. त्याला चांगले चांगले रुचकर पदार्थ खाऊ घालण्यात आले. एकूण त्याला खुश ठेवायचे. इकडे शिरुभाऊंची फाशी चुकणार नव्हती. आपल्या साक्षीनं दादा (शिरुभाऊ) फाशी जाणार या विचारानं त्याला अतोनात अस्वस्थता यायची. एके दिवशी त्याला न्यायासनापुढे उभं करण्यात आलं आणि आश्चर्याचा धक्का म्हणजे हा माफीचा साक्षीदार उलटला. त्यानं बेदम मार खाल्ला पण आपला



अनुक्रमणिका

निष्ठाधर्म सोडला नाही. शिरुभाऊंचा फास चुकवला. ते निर्दोष सुटले. मंगळवेढेकर लिहितात, 'माझ्या जीवनावर शिरुभाऊंच्या व्यक्तिमत्त्वाचा खूपच प्रभाव आहे. त्यांच्यामुळेच मला मोठ्या जगाचं दार दिसलं.'

त्यांच्या मनात शिरुभाऊ-अनुताईंच्या विवाहाची नोंद आहे. नोंदणी पद्धतीनं झालेल्या या विवाहाला महर्षि अण्णासाहेब कर्वे, रावसाहेब व अच्युतराव पटवर्धन, एस्. एम्. जोशी, न. चिं. केळकर, माटेमास्तर अशी थोर थोर मंडळी होती. सानेगुरुजी आणि अण्णासाहेब कर्वे यांनी साक्षीदार म्हणून सह्या केल्या होत्या. वसंत वापटांनी मंगलाष्टक म्हटलं होतं. हा सगळा प्रसंग त्यांना अद्‌भूत आनंदाचा वाटतो.

'महाराष्ट्र शाहीर' या कलापथकात दाखल झाल्यानंतरचा लेखकाचा प्रवास आणखी रंजक आहे. 'लोकरंजनातून लोकशिक्षण' साधण्याचा उदात्त हेतू त्यामागे होता. ही एक प्रकारची प्रबोधनात्मक चळवळच होती.

सानेगुरुजींसारख्या एका संवेदनशील, समाजाभिमुख कार्यकर्त्यांच्या संपर्कात दीर्घकाळ राहण्याचा सुयोग मंगळवेढेकरांना आला. तो काळ त्यांनी भरभरून लिहिलाय. आणि विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे सानेगुरुजींचं चरित्रलेखन करण्याची संधीही त्यांना मिळाली.

त्यांच्यातल्या लेखनगुणांना सतत वाव मिळत गेला. त्यांचं जगणं आणि लेखन हाच एकरसात्मक अनुभव होता. लेखन करण्यासाठी त्यांना नियोजनपूर्वक अनुभूतीच्या राज्यातून फिरावं लागलं नाही. ती त्यांची जीवनधारा होती. ते त्यांचं अमूल्य संचित होतं.

त्यांच्या सुदैवानं लेखनाच्या प्रेरणा कधी खंडित झाल्या नव्हत्या. नानासाहेब गोरे यांच्या शिफारसीवरून सांगलीच्या 'गावराज्य' या साप्ताहिकात त्यांनी काम करायला सुरुवात केली. पण इथल्या काही त्रुटींमुळे ते इथे फार काळ रमले नाहीत. दरम्यानच्या काळात परत त्यांच्यातला कार्यकर्ता कार्यरत झाला. पुढे 'भूदानयज्ञ' या साप्ताहिकात ते रुजू झाले. 'इथे मी विचारानं आणि भावनेनं समरसून गेलो.' असं ते लिहितात. विनोबा भावे हे त्यांच्या मनातलं महान आदराचं स्थान होतं.

दरम्यानच्या काळात या लेखकानं 'आंतरभारती'च्या कार्यालाही वाहून घेतलं होतं. त्या निमित्तानं लोकसंपर्क आणि भटकंती यात भरच पडत गेली. इथे काम करत असताना भारतभर हिंडून साने गुरुजींना अभिप्रेत असणारा भिन्न भिन्न प्रांतांचा परस्पर सांस्कृतिक परिचय देणारा 'आपला भारत' हा वीस पुस्तकांचा संच त्यांनी लिहिला. तसंच 'हा शोध भारताचा' हा प्राचीन भारताची ओळख करून देणारा दहा पुस्तकांचा संचही त्यांनी लिहिला. त्यांचा लेखनाचा झपाटा अफाटच होता.

'मुलांचा श्याम' या मासिकाची जबाबदारी त्यांनी काही काळ पेलली. त्यानंतर 'शब्दरंजन'चं कामही त्यांना बघावं लागलं. 'विरबल' मासिक, 'धरती' हे दिवाळी वार्षिक यांच्याशीही त्यांचा संबंध जडला. 'मी गोष्टीवेल्हाळ, सानेगुरुजींच्या कथामालेच्या कामातही सामील झालो.' त्या संदर्भात ते पुढे म्हणतात, 'कथाकथनातून माझे लेखनही घडले आणि लेखनातून कथाकथन.' त्यांच्या कथाकथनपर्वातले खूपसे अनुभव त्यांनी

विस्ताराने लिहिलेत.

एस्. एम्. जोशी, ग. दि. माळगूळकर, आचार्य अत्रे, ग. प्र.प्रधान, यदुनाथ थत्ते, बाबा आमटे, विनोबा भावे ही अलौकिक माणसं कधी काळी त्यांची निकटवर्ती बनलेली असतात. 'थोरांच्या बरोबर केलेल्या स्नेहयात्रेचा लाभ मला माझ्या जीवन विकासासाठी आणि समृद्धीसाठी तर झालाच पण लेखनासाठीही पुष्कळच झाला,' असा ते आदरपूर्वक उल्लेख करतात.

*'असो एथवरी आइ ऐसे जीवनभारुड'*

असं म्हणून ते या दीर्घ लेखनाचा समारोप करतात.

सुरुवातीला वाटतं, हे एवढं मोठ्ठ चारशे एकसष्ठ पानांचं भारुड वाचता वाचता थकवा येणार. पण एवढं विविधरंगी अनुभवांचं भांडार या लेखकाजवळ आहे. शिवाय ते लेखनातून मांडण्याची ताकदही. जोडीला ललितरम्य शैली. त्यामुळे ते भारुड अथकपणे वाचलं जातं. त्यांचा लेखनाचा ध्यास बघता असं म्हणावंसं वाटतं की श्री. मंगळवेढेकर फक्त गोष्टीवेल्हाळच नाहीत तर लेखनवेल्हाळही आहेत. त्यामुळे असं बोधप्रद, संदेशप्रधान, रंजनवादी 'भारुड' त्यांना लावता आलं.

□□

नंदा सुर्वे, 'आनंद-रंग' २७/३, हिंगणे (खुर्द), विठ्ठलवाडी, पुणे ४११ ०५१.

***'भारुड'** : लेखक - राजा मंगळवेढेकर, प्रकाशक - उत्कर्ष प्रकाशन, पुणे*
*किंमत - रु. २५०, पाने - डेमी ४६१*

---

## आपला प्रबंध मान्य झाला आहे काय ?

मराठी वाङ्मयात संशोधन करून आपण विद्यापीठाला सादर केलेला प्रबंध मान्य होऊन आपणास डॉक्टरेट मिळाली आहे काय? आपल्या प्रबंधाच्या विषयाचे थोडक्यात पण वैशिष्ट्यपूर्ण विवेचन सुमारे तीनशे शब्दात आपल्या अल्परिचयासह महाराष्ट्र साहित्य पत्रिकेकडे अवश्य पाठवावे. विषयाचे नाविन्य लक्षात घेऊन योग्य मजकुराला पत्रिकेत अवश्य प्रसिद्धी दिली जाईल.

—संपादक



अनुक्रमणिका






अनुक्रमणिका



प्रा. डॉ. मधुकर हसमनीस

# प्रवाही व चित्रमय भाषेतील कथानके 'ते दहा दिवस'

मधु कुलकर्ण्यांनी या लेखनातून 'कापूसखेड' हा आपला गाव त्याच्या सर्व वैशिष्ट्यांनिशी अनेक अंगांनी जिवंत केला आहे. 'ते दहा दिवस' हे त्यातले पहिलेच लेखन महाराष्ट्रात गांधीवधोत्तर ब्राह्मण विरोधी झालेल्या चळवळीचे समग्र दर्शन घडविते. हे सर्व वर्णन एका प्रातिनिधिक स्वरूपात आले आहे. केवळ पंधरा सोळा वर्षे वयाच्या पोरावर गांधीवधोत्तर दंगलीचे कोणते आघात झाले, ते अत्यंत स्पष्टपणे व कुठलाही आक्रस्ताळेपणा न करता अथवा कटुता न ठेवता वर्णिले आहे. 'शेवटी हे वावटळीचे कण खाली बसले ' असे लेखक म्हणतो त्यामुळे या लेखनाला कुठेही भडकपणा आलेला नाही.

प्रस्तावनेतच मधु कुलकर्णी लिहितात, 'खरे उत्कट लेखन हे लेखकाचे पर्यायाने आत्मचरित्र असते, आत्मपर लेखन हे या अंगाने जाणारे आविष्करण होय. डॉ. आनंद यादवांनी आत्मपर लेखनाचा बाज घेऊन कादंबरी मांडली, मी ललित लेखने मांडण्याचा प्रयत्न केला आहे.'

मधु कुलकर्णींनी आपल्या या कापूसखेडाबरोबरच आपल्या आजीचे (आईच्या आईचे) अत्यंत उत्कट चित्र रेखाटले आहे. अगदी लहान वयात आणि संक्रमण काळात या आजीनेच लेखकाचे घर कसे सांभाळले त्याचे चित्रण मनाला चटका लावते. लेखकाच्या अगदी लहानपणीच त्याचे आई-वडील वारले. त्यानंतर या पोराच्या प्राथमिक शाळेपासून तो - तो प्राचार्य होईपर्यंतचा व पुढे दुर्धट आजाराने ग्रस्त झाल्यानंतरचा त्याच्या जीवनाचा एक पटच लेखकाने अतिशय मार्मिकपणे व तितक्याच तटस्थतेने मांडला आहे. संक्षिप्तता हे या लेखनाचे आणखी एक वैशिष्ट्य. जीवनातील अगदी मोजक्याच पण उत्कट प्रसंगाची गुंफण त्यांनी अतिशय कुशलतेने केली आहे. घटनांची संक्षिप्तता व भाषेतील सुबोधता या पुस्तकाला लाभली आहे. अतिशय साध्या, प्रवाही व चित्रमय भाषेत ही सर्व कथानके येतात.

मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबाला गांधीवधोत्तर कसे हाल सोसावे लागले, कूळकायद्याने जमिनींचा कसा आधार तुटला हे 'शेवटी आम्हीही 'ख' केले या प्रकरणात आपणास दिसून

येते. या पुस्तकातील 'वाड्या'चे वर्णन सुद्धा हृदयस्पर्शी झाले आहे. वाड्यालाही एक व्यक्तिमत्त्व लाभले आहे. 'कापूसखेडचा आमचा वाडा मोठा, परिसर मोठा, पाचखणी दोन मोठे सोपे, एक खालचा एक वरचा, भिंती काचेसारख्या गुळगुळीत, वर कडीपाट, कडीपाटास मोठा सागवानी चकचकीत झोपाळा, दोन मोठ्या माड्या, माजघर ... वैठकीच्या खोलीत पांढऱ्याशुभ्र गाद्यागिरद्या, हंड्या झुंबरं, विस्तृत परस् - कडेला आड....' वाड्याच्या या परिसरात घुशींचा सुळसुळाट अपरिहार्य असतो, या घुशी एका रात्रीत कसा गाडीभर उकरा काढतात, त्याचे वास्तव चित्रण 'उकरा'त मिळते.

सर्व अडचणीवर मात करीत लेखक एम्. ए. होतो. शिक्षक, मुख्याध्यापक व प्राचार्य या पदांपर्यंत आपल्या बुद्धीने व कर्तबगारीने मजल मारतो. या शैक्षणिक अनुभवांचा मागोवा लेखकाने घेतला आहे. तालुक्याच्या ठिकाणच्या कॉलेजमध्येही कसे अशैक्षणिक व भ्रष्टाचाराचे वातावरण असते याचेही वास्तव चित्रण लेखकाने केले आहे - 'तासाला दंगा करणे, जाता-येता पोरीवाळींची थट्टामस्करी करणे व निवडणुकीच्या वेळेला अटीतटीला येणे हे कॉलेजमधील नित्याचेच अनुभव असतात.'

आयुष्याच्या अखेरीचा त्यांचा 'थोडासा जमा-खर्च' मनाला चटका लावून जाणारा आहे. मृत्यूची भीती नाही पण स्वत: पाय तोडावा लागल्यामुळे वेदनेने हैराण झालेल्या त्यांच्या मनात आपल्या आयुष्याच्या अखेरीस जे तरंग उठले, ते मन हेलावून टाकतात.

वरून गुळगुळीत दिसणाऱ्या या मध्यमवर्गीय जीवनातही ताणतणावांचे कसे चढउतार असतात, त्याचे प्रत्यंतर या लेखनातून मिळते.

ते 'दहा दिवस' हे मधु कुलकर्णींचे चौथे पुस्तक. यापूर्वी त्यांची तीन पुस्तके प्रकाशित झाली, पैकी 'यात्रा' व 'वळण' हे कथासंग्रह तर 'साहित्यिक आकृतिबंधाची जडणघडण' हे त्यांच्या पीएच्.डी.च्या प्रबंधाचे ग्रंथरूप.

'ते दहा दिवस' पुस्तकात मधु कुलकर्णींनी एकूण आठ लेखने लिहिली आहेत. १) ते दहा दिवस २) आम्हीही शेवटी 'ख' केले ३) मराठवाड्यातील पाच वर्षे ४) शिक्षणायन ५) थैमान ६) उकीर ७) ही लाभाविण प्रीत ८) थोडासा जमा-खर्च - त्यांचे हे लेखन मौज, साधना, हंस, विचारभारती अशा दिवाळी अंकातून वेळोवेळी प्रकाशित झाले आहे. त्यांचे हे लेख आत्मपर लेखनाचा एक आदर्श आहे.

या पुस्तकातील एक किरकोळ दोष असा की परिच्छेदच्या परिच्छेद जसेच्या तसे अनेक प्रकरणात आलेले आहेत. एकूण मराठी ललित लेखनात एका चांगल्या आत्मपर ललित लेखनाची भर टाकणारे हे पुस्तक आहे.

□ □

मधुकर हसमनीस, 'सावली' गणेश मंडईनजीक, इस्लामपूर, जि. सांगली ४१५ ४०९.

***ते दहा दिवस :*** *लेखक : मधु कुलकर्णी, पृष्ठे ११७, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई*
*प्रथमावृत्ती : फेब्रुवारी १९९६, मूल्य ८० रुपये*

डॉ. हेमंत इनामदार

# एका वाङ्मयीन सेवेचा ताळेबंद

सृष्टीची एक लहर असते. ती कुणावर, कशी आणि कधी प्रसन्न होईल, हे सांगता येत नाही. ज्या कुणाला नियतीचा कृपाप्रसाद लाभतो, त्याच्यावर ती अनेक गुणांची बरसात करते. कमलावराने आपल्या अनंत हस्तांनी तुम्हाला वरदान करायचे ठरविले, म्हणजे तुम्ही आपल्या दोन हातांनी ते सगळे दान झेलू शकत नाही. जगातले शास्त्रज्ञ, गायक, चित्रकार, शिल्पकार, कवी किंवा लेखक यांची चरित्रे पाहिली, म्हणजे देवी सरस्वतीच्या प्रसादाचे प्रत्यंतर येते.

शास्त्रज्ञाला किंवा लेखकाला अभ्यासाचे एखादे विशिष्ट क्षेत्रच का भावते, याचे गूढ ओळखणे कठीण आहे. जयंत नारळीकर गणिताच्या संशोधनाकडे का वळले? वाल्मिकीचा शोक श्लोकत्वच का पावला? कलावंताला जो उत्कट अनुभव येतो, तो अनुभव एका विशिष्ट वाङ्मय प्रकारातून व्यक्त करावा, असे त्याला का वाटते? प्रतिभेचे स्फुरण एका ठराविक माध्यमातून प्रगट होते; आणि आशय व आविष्कार यांचे एक अतूट नाते असते, हे मान्य करायला हवे.

- असा अनोखा अनुबंध सविता भावे यांच्या आजवरच्या साहित्यसंपदेतून प्रचीतीला आला आहे. भावे हे खरे तर हाडाचे कलावंत आणि कवी. पण त्यांची आजवरची वाङ्मयीन वाटचाल प्रामुख्याने चरित्रलेखनाच्या प्रांतातून झाली आहे. किंबहुना, 'सविता भावे म्हणजे एक समर्थ चरित्रलेखक' असे समीकरण वाचकांच्या मनात पक्के झाले आहे. नानासाहेब नारळकर, शेठ वालचंद हिराचंद, शंतनुराव किर्लोस्कर, लोकमान्य टिळक या महामानवांची उत्कृष्ट चरित्रे त्यांनी सादर केली. ज्या आयुर्विमा महामंडळात त्यांनी दीर्घकाळ सेवा बजावली, त्या मंडळाचा सर्वंकष इतिहास एका इंग्रजी ग्रंथातून त्यांनी सादर केला. कूपर इंजिनिअरिंग या प्रसिद्ध कारखान्याची कहाणी अक्षरबद्ध केली. नानासाहेब तळवलकरांच्या कर्तृत्वाचा आलेख शब्दांकित करून ठेवला. शांताबाई गुलाबचंद यांचे अद्‌भुत जीवनवृत्त प्रकाशात यावे, म्हणून त्यांना लाख मोलाचे मार्गदर्शन केले. नीलकंठ कल्याणी, सुमंत मुळगावकर आणि आण्णासाहेब शिंदे यांच्या कर्तृत्वसंपन्न



अनुक्रमणिका







व्यक्तिमत्त्वाची ओळख करून देणाऱ्या ग्रंथांची परिपूर्ण आणखी करून ठेवली. ज्या विनोबा भावे यांच्या कुळाचा थोर वारसा सविता भावे यांना लाभला, त्या 'भावे पिढी'चा वृत्तांत लिहून काढण्याचा संकल्प त्यांनी सोडला आहे.

सविता भावे यांना हे सारे ग्रंथलेखन कसे जमत गेले? भावे हे काही मराठीचे किंवा इंग्रजीचे प्राध्यापक नव्हते. ते कायद्याचे पदवीधर आहेत. त्यांच्या नोकरीची क्षेत्रेही साहित्याशी संबंधित नव्हती. पण तरीही चरित्रलेखनासारखा एक अवघड वाङ्मय प्रकार त्यांनी प्रभावीपणे हाताळला. आपले सूक्ष्म निरीक्षण, चौफेर व्यासंग, प्रदीर्घ उद्यमशीलता, काव्यात्म वृत्ती आणि सरल शैली यांच्या वळावर आपल्या चरित्र-ग्रंथातून चरित्रनायकांचे प्रत्ययकारी वर्णन त्यांनी घडविले. भावे यांच्या चरित्रपर लेखनाला यश लाभले, त्याचे आणखी एक कारण आहे. माणसांवर आणि माणसांच्या गुणवत्तेवर त्यांचे मनापासून प्रेम आहे. 'जें जें उत्तम, उदात्त, उन्नत, महन्मधुर जें जें' ते ते त्यांच्या मनाला आकर्षित करते. 'उत्कट, भव्य तेंचि घ्यावें।' मिळमिळीत अवघेंचि टाकावे' हा समर्थांचा संदेश त्यांच्या लेखणीला मानवला आहे. त्यामुळे राजकारण, उद्योग व्यवसाय व शिक्षण या संस्कृतीच्या तीन क्षेत्रात ज्यांनी असाधारण कामगिरी बजावली, त्यात लो. टिळक, वालचंदशेठ व नाना नारळकर यांच्या कर्तृत्वाची क्षितिजे त्यांनी धुंडाळली. आपापल्या ध्येयांनी झपाटलेली मोठी माणसे त्यांना आवडली; आणि त्यांच्या जीवनाची कोंडी उलगडून दाखवताना भावे यांनी त्यात स्वत:ला झोकून दिले. हे करताना समरसतेतले सौंदर्य त्यांनी मनोमन अनुभवले. ही चरित्रे लिहिताना त्यांच्या मनात प्रसन्नतेचे मळे वहरले.

सविता भावे आज एकसष्टीच्या उंबरठ्यावर उभे आहेत. या उंबरठ्यावरून त्यांनी मागे वळून पाहिले आहे. वयाच्या सहाव्या वर्षापासून आजपर्यंतच्या, साडेपाच दशकांच्या कालावधीत घडलेला लेखन-प्रवास त्यांनी आठवून पाहिला आहे. 'अक्षरप्रीत' हे त्यांचे ताजे पुस्तक म्हणजे आपल्या या वाङ्मयीन कामगिरीचा त्यांनी स्वत:च मांडलेला ताळेबंद आहे. त्यांचे हे अक्षररूप सिंहावलोकन म्हणजे एक प्रसन्न व प्रकट चिंतन आहे. आपल्या लेखनातील बलस्थाने आणि शवलस्थानेही त्यांनी प्रांजलपणे स्पष्ट केली आहेत. चांगली माणसे आणि सच्चे मित्र त्यांच्या आयुष्यात येत गेले. 'जेथे राघव, तेथे सीता' या वचनाचा प्रत्यय आणून देणारी धर्मपत्नी त्यांना मिळाली. मुली आणि जावई यांच्यावर त्यांनी केलेल्या वात्सल्याचा वर्षाव त्यांना सुखद प्रतिसाद देणारा ठरला. या सर्वांतून त्यांच्या वाङ्मयीन आयुष्याची कहाणी सफल संपूर्ण झाली. 'अक्षरप्रीत' हे या कहाणीचे सर्वस्वी नवे, पण नम्र असे निवेदन आहे. ते मुळातूनच वाचावे, अशा तोलामोलाचे आहे.

या पुस्तकाची मांडणी, छपाई व एकूण निर्मिती सुरेख आहे. चित्रकार चारुहास पंडित यांनी सिद्ध केलेले मोरपिसाचे मुखपृष्ठ ग्रंथनामाला साजेसे, सूचक व सुंदर आहे. मुखपृष्ठ चारवरील 'अक्षर प्रीतीमध्ये फुललेला परिवार' सहज लक्ष वेधून घेतो. तिथे केलेले या कौटुंबिक छायाचित्राचे संयोजन समर्पक

आहे. पुण्यातील 'वरदा प्रकाशन' या संस्थेच्या लौकिकात भर घालील, अशा योग्यतेचे हे पुस्तक आहे. '- ग्रंथु निका जाला असे !'

□ □

डॉ. हेमंत इनामदार, ६०/१५, भारतीनिवास कॉलनी, पुणे ४११ ००४.

**अक्षरप्रीती** : लेखक- श्री. सविता रा. भावे, प्रकाशक : श्री. भावे, वरदा बुक्स, सेनापती बापट मार्ग, पुणे ४११०१६.

---

डॉ. मीरा घांडगे

# लोकसाहित्याची 'गतिधारा'

लोकसाहित्य ते ग्रामीण साहित्य असा नवा अनुबंध सांगणारा, लोकसाहित्य व ग्रामीण साहित्याचे अत्यंत निकटचे नाते उलगडून दाखविणारा डॉ. मिरदेव गायकवाड यांचा 'गतिधारा' हा ग्रंथ लोकसाहित्याकडे वेगळ्या दृष्टीने पहावयास सांगतो.

ग्राम जीवनाचा व शेतीचा निकटचा संबंध व त्यातूनच आईसारखी पालनपोषण करणारी ही काळी आई अशी या लोकांची धारणा. पूर्णपणे निसर्गावर अवलंबून असणारा हा समाज अतिशय श्रद्धाशील-देवाधर्मावर श्रद्धा ठेवणाऱ्या या समाजाच्या परंपरेने चालत आलेल्या धर्मश्रद्धा, रुढी, परंपरा यातूनच लोक जीवनाची पर्यायाने लोकसाहित्याचे पाळेमुळे रुजली गेली असा एक विचार या ग्रंथातून व्यक्त केलेला दिसतो.

'स्त्री व सृजनशील भूमी यांच्यामध्ये यात्वात्मक संबंध आहे, असे डॉ. गायकवाड मानतात. हेच सूत्र शेवटपर्यंत ते आपल्या ग्रंथात मांडतात. ज्याप्रमाणे स्त्रीमध्ये जननक्षमता आहे, त्याप्रमाणे भूमीत नवनिर्मितीची क्षमता आहे. त्यामुळेच ती स्त्रीरूपसदृश असते. ग्रामीण जीवनात देवीचा उत्सव साजरा केला जातो. तो नवनिर्मितीचा उत्सव असतो. ग्रामीण जीवनाची ही परंपरा किती अतिप्राचीन काळची आहे, याचा शोध लेखकांनी आर्यपूर्व काळापर्यंत जाऊन घेतलेला दिसतो. स्त्रीच्या ठिकाणी असलेल्या सृजनशीलतेमुळे ती सामर्थ्यशाली बनली व तिची समाजामध्ये शक्तिपूजा (देवीपूजा) होऊ लागली. त्यामुळे या आदिशक्तीचे उपासकही (कडकलक्ष्मी, पोतराज इ.) स्त्रीवेशातून भक्ती करू लागले. स्त्रीचे सामर्थ्य वाढू लागले. तिच्या बहूप्रसवतेच्या गुणामुळे एरवी गणिकेला निंद्य स्थान देणारा समाज विवाहकार्याप्रसंगी तिला पूज्य स्थान देऊन तिच्यासारखे नववधूला अखंड सौभाग्यवतीचे दान मागतात.

पृथ्वीचे मूर्तरूप स्त्रीत पाहिल्याने पृथ्वीची श्रद्धास्थाने असलेल्या देवतांच्या रूपातून निर्माण झाली व त्यातूनच अनेक पंथांची निर्मिती झालेली दिसते. याचा शोध लेखकांनी वेदपूर्वकालापासून घेतलेला दिसतो. त्यातूनच वाममार्गाने जाणारे तंत्रमार्गही निर्माण झाले. विशेषत: शाक्तांचा तंत्रमार्ग व त्यामधील

वामाचार. त्यांच्यामध्ये पावित्र्यापेक्षा वासना, भोग यांचेच सामाज्य जास्त होते, याची ओळख करून दिलेली दिसते. पण ही शक्ती देवता मान्य असलेल्या ज्ञानदेव, एकनाथ, रामदास या संतांनी आदिशक्तीचे स्तवन केले, तिला आवाहन केले तर शाक्तांच्या संभाचरावर जळजळीत टीका केली ते उदाहरणासह लेखक स्पष्ट करतात.

मराठी कृषिसंस्कृतीप्रधान प्रदेशाचा स्थळ देवतांचा परिवार वेताळ, म्हसोबा, खळनाथ, बिरोबा इ. पुरुषरूपी देवतांप्रमाणे भवानी, महालक्ष्मी, कालिमाता, जाखाई, मळाई, यमाई, रेणूका इ. स्त्री रूपातूनही पूजिल्या जातात. यामध्ये स्त्रीत्व जाणून घेऊन धरणीमातेची तर पौरुषत्व जाणून घेऊन आकाशरूपी पित्याची कल्पना प्रतिकात्मकतेने आली. त्यातूनच तुळजापूर, माहूर, कोल्हापूर यासारखी शक्तिपीठे निर्माण झाली. पण तरीही या भावनेकडे निकोप दृष्टीने पाहिले न गेल्याने मुरळी, जोगतीण, भावीण यासारख्या स्त्री भक्तांच्या स्वैरवर्तनास देवभक्तीच्या गोंडस वलयात सुरक्षित ठेवले आहे, असे लेखकांना वाटते.

या शक्तीदेवीच्या आराधनेसाठी या देवतांची स्तुतीपर कवने रचिली, गायिली गेली व ती परंपरेने लोकमानसात रुजली गेली. गोंधळी, भराडी, भोप्ये, पोतराज, वाघ्या-मुरळी इ. सारख्या लोकसंस्कृतीच्या उपासकांनी धर्मश्रद्धेचा आश्रय घेऊन या लोककलेच्या जडण-घडणीचे मोठे कार्य केले. त्यापैकी एक उपासक म्हणजे गोंधळी. रेणुकेचा आणि तुळजाभवानीचा उपासक असलेल्या या गोंधळ्याची परंपरा व गोंधळ्याच्या स्वरूपाचा पूर्ण परिचय या ग्रंथात आला आहे.

परंपरेने चालत आलेल्या लोकजीवनाचा ग्रामीण जीवनाशी अत्यंत जवळचा संबंध आहे. 'कृषी आणि स्त्री' यांच्यातील यात्वात्मक संबंध, त्यातून कृषिदेवतेचे प्रतीक म्हणून आलेली देवता कल्पना, देवतांची आराधना करणाऱ्या भक्तांचा वर्ग, त्यांनी रचलेली कवने, त्यातून नजरेस येणाऱ्या ग्रामीण जीवनातील प्रतिमा, वातावरण अशा साखळीतून ग्रामीण जीवनाची धारा फिरताना दिसते.' (पृ. ९०) एवढेच नव्हे तर 'लोकसाहित्यातून दिसणारी मानवी सुख-दु:खांची श्रद्धेची भावना ग्रामसंस्कृतीतून प्रकटताना दिसते. म्हणूनच आधुनिक ग्रामीण साहित्याची धारा अशा कृषिसंस्कृतीतून, भूमीतून रोप तरारून वर यावे तशी उगम पावली आहे. तिचा स्त्रोत देवतारूपात पाहिलेल्या कृषीपर्यंत जाऊन पोहोचतो. (पृ. १०३) असा लोकसाहित्याचा ग्रामीण जीवनाशी असलेला अनुबंध लेखकाने उलगडून दाखविला आहे.

कृषिनिष्ठ जीवन, त्या जीवन जगण्यामागील धारणा, त्यातून घडलेले संस्कार, श्रद्धा यातून ग्रामीण जीवन साकार झाले आहे. मराठी लोककलांचा उगम प्राचीन कालापासूनचा आहे. लोककलांच्या उपासकांनी ही परंपरा प्राचीन कालापासून जतन केलेली आहे व तिचा ग्रामीण जीवनाशी घनिष्ठ संबंध आहे. म्हणूनच लोकसाहित्य हे ग्रामीण साहित्याचे उगमस्थान आहे, असा लेखकांनी अन्वयार्थ लावलेला दिसतो. एक अभ्यासपूर्ण ग्रंथ म्हणून या ग्रंथाकडे पाहता येते.

□□

*गतिधारा, डॉ. मिरदेव गायकवाड, प्रकाशक, नवीन उद्योग, पुणे, डिसें. १९९६* □ डॉ. मीरा घांडगे, उज्ज्वल अपार्टमेंट, बी - ५, २ रा मजला, अजिंक्यनगरजवळ, पुणे-सिंहगड रोड, विठ्ठलवाडी, (हिंगणे खुर्द), पुणे - ४११ ०५१.










प्रा. भगवान ठाकूर

# आंबेडकरी जाणिवांची वैश्विक 'लेणी'

१९६० नंतरचे एकूणच मराठी साहित्य नवनव्या वाङ्मयीन प्रवाह, प्रवृत्ती, जाण आणि जाणिवांनी समृद्ध होत गेलेले दिसते. पारंपरिक जीवनानुभवाचा एकपदरीपणा, आशयाचा पातळ, विरलेला पोत नव्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाशयाने श्रीमंत होत गेला. ग्रामीण, दलित, भटक्याविमुक्त, आदिवासी, जनवादी, स्त्रीवादी, मुस्लिम, ख्रिश्चन, जैन, कामगारसाहित्य अशा बांधिलकीच्या जीवनाश्रयी वाङ्मयीन सृजनशीलतेने विविध साहित्य प्रकारांना वहुआयामित्व बहाल केले. फुले-आंबडेकरी प्रेरणा हेच उर्जाकेंद्र मानून अनेक दलित कवी, कथाकार, आत्मकथाकार, कादंबरीकार, नाटककार आणि समीक्षकांनीही वाङ्मयीन चळवळीस नवी दृष्टी आणि दृष्टिकोन दिला. त्यांनी कोरलेल्या या विचारसुंदर कोरीव लेण्यांचा साक्षेपी आलेख दलित साहित्याचे भाष्यकार, ज्येष्ठ साहित्यिक आणि समीक्षक डॉ. गंगाधर पानतावणे यांनी 'लेणी' या लेखसंग्रहात रेखाटला आहे.

'लेणी' हा लेखसंग्रह दलित साहित्य निर्मितीचा आणि दलित साहित्य चळवळीचाही महत्त्वाचा ऐतिहासिक दस्तऐवजच आहे. या 'लेणी'त गेल्या दोन-तीन दशकातील दलित वैचारिक, सृजनात्मक, संशोधनात्मक लेखन करणाऱ्या समर्थ लेखकांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचे नीरक्षीरन्यायाने मूल्यमापन केले आहे. १३५ पृष्ठांच्या या लेखसंग्रहात नामदेव ढसाळ, बाबुराव बागुल, केशव मेश्राम, राजा ढाले, वामन होंवाळ, दया पवार, त्र्यंबक सपकाळे, योगीराज वाघमारे, रत्नाकर गणवीर आणि शरणकुमार लिंबाळे या दहा दलित कवी, कथाकार, कादंबरीकार, आत्मकथन-कारांच्या जागण्या आणि जगण्याचा, आत्मभान, आत्मसन्मानप्राप्तीच्या धडपडीची ही विशाल आणि वैश्विक लेणी आहेत.

'लेणी' हे शीर्षकच दलित जाणीवांचे नाते विश्वव्यापक अशा बौद्ध संस्कृतीला जोडणारे, प्रतिकात्मक सार्थ आहे.

हे दहा सर्जनशील कलावंत दलित



अनुक्रमणिका

साहित्याच्या चळवळीतील कार्यकर्तेही आहेत म्हणून 'वाङ्मय निर्मितीमध्ये व्यक्तित्त्व आणि वास्तव या घटकांना प्राधान्य असते' याप्रमाणे या दलित प्रज्ञावंतांच्या व्यक्तित्त्व आणि व्यक्तिमत्त्वाचेही दर्शन या लेखात होणे स्वाभाविक आणि औचित्यपूर्ण आहे. लेणीतील लेखक-कवींच्या वाङ्मयीन सामर्थ्याचे आकाश इतके भव्य आणि 'नीळेभोर' आहे की त्या प्रत्येकावर 'लेणी' सारखे स्वतंत्र लेखन होऊ शकेल. डॉ. पानतावणे यांच्या व्यासंग आणि चिंतनाचा, प्रज्ञा व प्रतिभेचा, भाषाप्रभुत्व आणि अल्पाक्षरवेधशक्तीचा कसच या 'लेणी'मध्ये लागला आहे. त्यांच्या बहुअर्थप्रसव सर्जक समीक्षाशक्तीचा प्रत्यय लेणीत प्रकर्षाने होतो.

'लेणी'तील लेखांची नुसती शीर्षके जरी वाचली तरी याची कल्पना येते. त्या त्या लेखक, कवी, कथाकाराच्या कार्य आणि कर्तृत्वाचा सम्यक विचार करून त्यास अनुरूप व अन्वयार्थक शीर्षके लेखास दिली आहेत. उदा. मानवी आकांताचा शोध घेणारा कवी-नामदेव ढसाळ, राजा ढाले हे दलित साहित्य या संकल्पनेऐवजी 'आंबेडकर साहित्य' या संकल्पनेचा आग्रह धरतात म्हणून पानतावणे यांनी फार सूचकपणे त्यांच्यासाठी 'आंबेडकरी प्रेरणेचा प्रज्ञावंत लेखक - राजा ढाले' असे शीर्षक दिले आहे.

'लेणी'तून या दलित लेखकांच्या 'लेखक' म्हणूनच्या क्षमतेचाच वेध आणि शोध पानतावणे घेतात असे नाही तर वैयक्तिक स्नेहबंधांच्या आठवणींना उजाळा देत त्या त्या कलावंतातील 'माणूस'ही आपल्याला भेटवतात. दलित कलावंताची सर्जनशीलता 'मी'पासून 'आम्ही'पर्यंत कशी विश्वात्मक होत जाते, हे समष्टिभानच त्याला कसे वेदना, विद्रोह, नकार आणि स्वीकार शिकवते याचे सप्रमाण प्रमेय पानतावणे मांडतात.

पानतावणे यांची समीक्षा केवळ रसग्रहणात्मक, आस्वादात्मक वा व्यक्तिनिष्ठ नाही. ती संशोधनात्मक, वस्तुनिष्ठही आहे.

मर्मभेदक विश्लेषण, बुद्धीनिष्ठ विवेचन, आणि निर्भिड विचारप्रतिपादन ही त्यांच्या समीक्षेची वैशिष्ट्ये 'लेणी'तूनही पुरेपूर प्रत्ययास येतात.

दलित कलावंताच्या मनातील ताणतणाव, आत्मसंघर्ष, आत्मटीकेचं भान, स्वशवविच्छेदनाचा प्रांजळपणा याचा धांडोळा पानतावणे घेतात. दलित साहित्य चळवळीचे भान जसे पानतावणे यांना आहे तशी दलित कलावंतातील कलात्मक जाणिवांचे कलाभानही त्यांना आहे. 'समतोल' समीक्षा या शब्दातच 'लेणी'तील लेखांचे मूल्यमापन करावे लागेल. वस्तुनिष्ठ, तटस्थ व तर्कसंगत प्रतिपादन हे त्यांच्या समीक्षेचे वैशिष्ट्य लेणीतही जाणवते. उदा. दया पवारांच्या लेखन जाणिवांचा प्रवास नोंदविताना ते म्हणतात, 'प्रारंभी साहित्याच्या पारंपरिक प्रवाहात रमणारा हा लेखक आंबेडकरी चळवळीने सावरला.' (पृ. ६५) पानतावणे यांच्या लेखनशैलीचा आणखी एक गुण 'लेणी'त आढळतो. तो म्हणजे 'गतिमान विचारशलाका'. सम्यक चिंतन, प्रागतिक साहित्य चळवळींचे सखोल आकलन आणि स्वत:ची एक समीक्षादृष्टी आणि दृष्टिकोन असल्यामुळे वैचारिक

विश्लेषणात कुठेही गतिरोध नाही, विरोधाभास नाही. दया पवारांचा 'दु:खाने गदगदलेलं झाड' असा यथार्थ गौरव पानतावणेच करतात; पण जिथे एक संशोधक, भाष्यकाराच्या सत्यान्वेशणाचा कस लागतो तिथे 'पवारांपूर्वीच केशव मेश्रामांचे 'हकिकत व जटायू' प्रकाशित झाले.' (पृ. ६९) असा स्पष्ट निर्वाळाही देतात. पानतावणे आपल्या रसग्रहणाला रुक्षता, बोजडपणा येऊ देत नाहीत. कवींच्या महत्त्वाच्या, लक्षवेधक कवितांची अवतरणे, कथेतील आशयकळीचे घटना-प्रसंग, आत्मकथनातील प्रामाणिकपणाचे सूत्र ते सोदाहरण उलगडून दाखवतात.

उदा.

'कालच तो गुहेच्या तोंडाशी
ठेवून गेला पिसाळलेला जाळ
मी शिलगावीत जाणार आहे
या पुढचा काळ !'
(नामदेव ढसाळ; पृ. ७)

राजा ढाले असोत की केशव मेश्राम यांच्या लेखनातील सगळी रग आणि धग, तडफड आणि विद्रोह, कलात्मकता आणि संयमही पानतावणे तटस्थपणे शब्दांकित करतात. या लेखकांनी विविध वाङ्मयप्रकार हाताळलेत. त्यातील जो वाङ्मयप्रकार पानतावणे यांना अधिक भावला, भिडला त्यावर अधिक विस्ताराने त्यांनी लिहिले आहे. उदा. बाबुराव बागुल यांच्या कथांवर, दया पवारांच्या 'चावडी'सारख्या स्फुट लेखनावर कोंडवाड्यातील कवितेवर ते अधिक समरसून लिहितात. समीक्षक बाबुराव बागुल यावर अधिक प्रकाश पडायला हवा होता. 'बलुतं'च्या निमित्ताने एकूणच दलित आत्मकथनांवर पानतावणे यांनी साक्षेपी भाष्य केले आहे. त्या निमित्ताने दलित आत्मकथनकारांना 'धोक्याचा इशारा'ही दिला आहे. 'लेणी'तील भाषा आणि शब्दकळा हा एक स्वतंत्र चिंतनाचा विषय ठरावा. बहुअर्थप्रसव अल्पाक्षर शब्दकळेचा जागोजाग आढळ होतो. उदा. रक्तात पेटलेल्या अगणित सूर्यांना हाकारीत (पृ. ९) 'नादान सभ्यतेला सोलून काढीत (पृ. ९) कराल वैषम्य, नतद्रष्ट शोषण (पृ. ११) भीम हा दलितांच्या युगदुखण्यावरी दवा आहे. (पृ. ३७) इ.

सारांश 'लेणी'च्या रूपाने साठोत्तरी दलित साहित्याच्या सशक्त वाटचालीचा सांस्कृतिक ऐवजच पानतावणे यांनी वाचकांसमोर ठेवला आहे. त्यांच्या लेखणीने मूल्यांकित केलेल्या याही 'वादळाच्या वंशजांचे' वाचक मनापासून स्वागत करतील, यात शंका नाही.

□□

प्रा. भगवान ठाकूर, १५ ब, अविष्कार, मार्केट यार्ड मागे, विठ्ठलनगर, धुळे

लेणी (लेखसंग्रह) डॉ. गंगाधर पानतावणे,

प्रतिमा प्रकाशन, १३६२, औदुंबर अपार्टमेंटस्, सदाशिव पेठ, पुणे-४११ ०३०,
पृष्ठ संख्या - १३५, मूल्य - ८५ रुपये.












## ग. ल. ठोकळ यांचे निवडक साहित्य

| | |
|---|---|
| गावगुंड (कादंबरी) | रु. ४०/- |
| टेंभा (कादंबरी) | रु. ६०/- |
| ठिणगी (कादंबरी) | रु. २५/- |
| मीठभाकर (काव्य) | रु. ४०/- |
| सुगी (काव्य) | रु. ६०/- |
| मत्स्यकन्या (कथा) | रु. ५०/- |
| क्षितिजाच्या पलीकडे (कथा) | रु. ४०/- |
| पहिले चुंबन (कथा) | रु. २५/- |
| सुगंध (कथा) | रु. ६०/- |
| कडुसाखर (कथा) | रु. ५०/- |
| कशासाठी पोटासाठी (नाटक) | रु. २०/- |
| ठोकळ गोष्टी भाग १ ते ५ | रु. ४००/- |
| निवडक ठोकळ कथा संकलन-प्रस्तावना : शान्ता ज. शेळके | रु. २००/- |



**श्री लेखन वाचन भांडार**

१००४ बुधवार पेठ,
स्टेट बँक सिटी ब्रँचजवळ,
पुणे ४११ ००२
फोन - ४७४४७९.

## ज्ञानपीठ पारितोषिकाचे मानकरी कोण असावे?

मराठीतील साहित्यिकांपैकी यापुढील ज्ञानपीठ पारितोषिक कोणाला मिळावे असे तुम्हाला वाटते आणि का?

आपले मनोगत सुमारे तीनशे शब्दांत मुद्देसूद मांडून ते संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, टिळक रोड, पुणे - ४११०३० या पत्त्यावर ३१ ऑगस्ट १९९७ पर्यंत अवश्य पाठवावे. निवडक मनोगतांना महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या दिवाळी अंकात प्रसिद्धी दिली जाईल.

—संपादक

## दरमहा एक तरी पुस्तक विकत घेऊन



वाचा !
आणि
आपल्या मित्रांनाही सांगा !

डॉ. शंतनु वसंत चिंधडे

# काव्यानंद




**सर्वांगसुंदर आणि लाघवी अंतर्देही**

कविवर्य मनोहर महादेव तथा म. म. देशपांडे हे मराठीतले एक श्रेष्ठ कवी आहेत. सर्वसामान्य काव्य रसिकास ते काहीसे अज्ञात असले तरी विचक्षण काव्य रसिकास त्यांच्या कवितेचे सामर्थ्य आणि अंत:सूर जाणवलेले आहेत. यवतमाळ, भोपाळसारख्या 'काहीशा' आडबाजूला राहून त्यांनी अतिशय धीम्यागतीने पण फार श्रेष्ठ दर्जाची मनस्वी कविता लिहिलेली आहे. 'वनफूल' हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह, 'मौज' प्रकाशनाने १९६६ साली प्रकाशित केला. तद्नंतर तब्बल तीस वर्षांच्या विश्रामानंतर 'अंतर्देही' हा अंतर्बाह्य लावण्याने नटलेला व उण्यापुऱ्या एकूण साठ कवितांचा संग्रह मराठी कवितेचे दालन समृद्ध करण्यासाठी रसिकांपुढे सादर झाला आहे.



अनुक्रमणिका

*छातीवर दगड जरी ठेवला...*
*तरी ही हिरवी पाने -*
*कुठून फुटतात... कळत नाही...!*

किंवा

*संध्येचा शामल हात कोवळा... पकडू पहातो*
*नदीकाठचा उडता बगळा... पुसट पुसट क्षितिज रेषा...*
*मीलनामधील - दोन जीवांची अस्फुट भाषा...!*

असं तरल आणि तळस्पर्शी लिहून जाणारे म. म. देशपांडे 'अंतर्देही'मध्ये देखील जुनीच कल्पकता नव्या दमाने रसिकांपुढे सादर करतात. संग्रहातल्या बहुतेक सर्व कविता 'सत्यकथा, मौज, कवितारती, तरुण भारत आदि दर्जेदार नियतकालिकातून पूर्वी प्रसिद्ध झाल्या आहेत. अल्पाक्षरी चिंतनगर्भता हे म. मं.चे वैशिष्ट्य. ह्याही संग्रहातून मोठ्या सामर्थ्यानिशी प्रकट होते. भोवतालच्या विदारक समाजजीवनातील दाहक अनुभूती संस्कृत शब्दबंधातून वरचेवर प्रकट होत रहाते. या ओळी बघा -

*वास्तवातून वास्तवात... विस्तवातून पुन्हा विस्तवात -*
*निखारे दाहक... वितळल्या मनाचे -*
*कुणी नाही वाहक...*

ज्या कवितेवरून या संग्रहाला 'अंतर्देही' हे नाव मिळाले ती कविता (पान ३३) एक श्रेष्ठ कविता आहे. 'मला पाऊले नकोत कारण कल्पनेचे पंख मिळाले आहेत. मात्र आकाशव्यापी श्रवण शक्ति नाहीशी झाली... जिवाभावाचे काही कवळायला हात उरले नाहीत, त्यामुळे आतल्या आत वणवण करीत फिरतो आहे... जे समोर दिसते आहे, त्याचे काय... कवी म्हणतो,

*समोरिलाचे स्मरण नसे पण ...*
*हृद्घंटेची घणघण... घणघण...!*

अशाच ताकदीच्या ढोर, दान, तू म्हटले, पुतळा, आभाळ, कांक्ष, किती डोळे बंद, आनंदमोर, अनुभव आदि कविता अतिसुंदर आहेत. साठोत्तरी कवितेत आलेली आशयघनता, आत्मपरता, चिंतन, मुक्तशैली ही सर्व गुणवैशिष्ट्ये घेऊन आलेली म. म. देशपांडेंची कविता गांभीर्याने वाचायला हवी. तिचे नीट आकलन होण्यासाठी थोडी तपश्चर्या करायला हवी. तिच्या अंतर्देहातले सौंदर्य कष्टसाध्य आहे, हेही नक्कीच. म. मं.च्यां कवितेला अजून उचित न्याय मिळायला हवा.

*अंतर्देही : कवि. म. म. देशपांडे*
*प्रकाशक : श्रीवत्स प्रकाशन, नागपूर, पृष्ठे डेमी ८०, मूल्य रु. ३०/-*

□



अनुक्रमणिका






## 'रुबाई'च्या अंगाने लिहिलेल्या आश्वासक 'चारोळ्या'

कवि महेश घाटपांडे यांचा हा चौथा संग्रह आहे आणि तोही सहा महिन्यात. यावरून कवीच्या काव्यनिर्मितीचा आवेग लक्षात यावा. काव्यनिर्मितीची ही संख्यात्मक बाजू लक्षात येताच वाचकांच्या मनात काही अपेक्षा निर्माण होतात. जसजसा आपण हा संग्रह हाताळू लागतो, तसतसा काही प्रमाणात का होईना काव्यानंदाचा प्रत्यय आपणास येऊ लागतो. एके काळी विपुल प्रमाणात लिहिल्या गेलेल्या व कविवर्य रॉय किणीकरांनी अतिशय समर्थपणे वापरलेल्या 'रुबायां'च्या अंगाने या सर्व रचना केल्या आहेत. 'चारोळ्या' या नावाने रसिक परिचित झालेला हा आणखी एका रचनाबंध संग्रहात एकूण ९९ 'रुबाया' समाविष्ट केल्या आहेत. प्रेम, व्यथा, निराशा, जीवनाचे तत्त्वज्ञान, विरह, उपहास, उपदेश असे विविध विषय या रचनांमधून व्यक्त होतात.

*'जरि सत्य असे ते तुझेच सोडुन जाणे...*
*तरि आठवते मग तुझेच प्रीतीगाणे...*
*वेदना उराशी साठवून मी जगतो -*
*तुज रोज मनाच्या आरशात मी बघतो...!*

अशासारख्या सफाईदार आणि प्रीतिभावना उत्कटपणे व्यक्त करणाऱ्या रचना संग्रहात आढळतात. विशिष्ट लय, अचुक शब्दरचना, आशय विषयाचे सामर्थ्य रसिकाचे चित्त वेधून घेते. ही आणखी एक रचना पहा,

*ती दोन पाखरे डोळ्यांची फडफडली*
*सांगती साजणा प्रीत तुझ्यावर जडली*
*तूं अखंड देरे दर्शन याच जिवाला*
*येईल असा मग जन्म हाच कामाला...!*

अशाही पद्धतीने प्रेमाचे आर्जव व्यक्त होते.

वर उल्लेख केलेल्या मन:पूत आणि छंदोरचना... परिपूर्ण रचना अधुनमधून आढळतात. इतर काही रचनांतून यतिभंग, अतिरिक्त मात्रा, मात्रासंकोच, कल्पनांची पुनरुक्ती व शब्दबंबाळपणा आदि काव्य दोष आढळतात. चाकोरीबाहेरचे विषय निवडून व विविध रचनापद्धतींचा पाठपुरावा केल्यास कवीच्या हातून अधिक चांगली कविता रसिकांना वाचायला मिळेल असे आश्वासन 'युगान्त'चे वाचन करताना मिळते. एक हलका-फुलका, सहजगत्या हाताळता येणारा, दोन क्षण अंतर्मुख करून आनंद देणारा व समाधानकारक बाह्यांग ल्यालेला हा संग्रह काव्यरसिकांनी जरूर पहावा असा आहे.

*'युगांत' : कवि महेश घाटपांडे*
*सुयश प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६६, मूल्य रु. २५/-*














**आयुष्याच्या वळणांवरची सोज्ज्वळ कविता !**

अतिशय अभिरुचीपूर्ण आणि सुंदर मुखपृष्ठ लाभलेला 'वळणावरून' या कवयित्री सौ. सुषमा गरुड यांचा हा पहिलाच भरीव असा काव्यसंग्रह आहे. आपल्या भावंडांमधील साहित्यगुणांचा जवळून परिचय झाल्यामुळे व त्या वातावरणाचे मनावर संस्कार घेऊनच कवयित्रीला लेखनप्रेरणा झाल्याचा अनुभव व्यक्त झाला आहे. वयाच्या तिशीनंतर खऱ्या अर्थाने त्यांनी स्वतंत्ररीत्या काव्य लेखनास प्रारंभ केला आहे. त्यांच्या जीवन प्रवासात अनेक वळणं आली, चढ-उतार त्यांनी अनुभवले. काटेकुटे, खाचखळगे लागले, त्याचबरोबर वृक्षांची गर्द छाया, हिरवळ, शारदीय चांदणं या गोष्टींनी देखील कवयित्रीची शब्दकला फुलवली आहे. या अनुभवांचे, स्मृतींचे पडसाद त्यांच्या कवितात उमटल्याचे आढळते.

एकूण ५१ कवितांचा अंतर्भाव या संग्रहात केलेला आहे. 'वादळ' या नभोनाट्यासाठी दोन गीतात्मक रचना, शिवराज्याभिषेक त्रिशताब्दी महोत्सवानिमित्त पाळणा, आरती अशा पारंपरिक अंगाच्या रचना, प्रासंगिक काव्य, कुणाच्या जयंत्या, मयत्यांच्या निमित्ताने मन भारावून गेलेल्या अवस्थेतल्या रचना आणि आयुष्यातली नेहेमीची सुखदु:खे व भावभावना व्यक्त करणारी साधी व सोज्ज्वळ अशी शब्दकळा कवयित्रीला लाभलेली आहे. बहुतांशी रचना छंदोबद्ध, वृत्तबद्ध, गेयता लाभलेल्या आहेत. स्त्रीमुक्ती (पान ३७), त्रिवेणीसंगम (पान ३४), नवकवितेस (पान २५) अशा अपवादात्मक मुक्ताईतल्या रचनाही आढळतात. अलिकडच्या नवकवितेचं रुपडं पाहून कवयित्री अवाक् बनते. तिचं वेगळेपण आगळी-वेगळी वेषभूषा व भाषा तिला भुलवते. पण दशदिशांनी कोन साधून नवकवितेला न्याहाळलं तरी तिचं अंतरंग आपणास कळलंच नाही, असं कवयित्री कबूल करते. इतक्या जवळ येऊनही तू आपले अंतरंग का उकलत नाहीस... तुझ्या शब्दात बद्ध झालेलं गीत असं अबोध का... की दुरून डोंगर साजरे असंच म्हणायचं...' अतिशय परिणामकारकरीत्या नवकवितेतल्या दुर्बोधतेविषयी कवयित्री लिहून जाते व रसिकाची दाद घेते.

*'वसंत गेला संपून तरी दिलासा देतात पंचम स्वर...*
*रात्र असली अंधारी तरी अस्फुट कुठेशी चंद्राची कोर...'*

किंवा

*'जोगिया' जागतो मनी कंठ होई आज रुद्ध*
*ज्ञानेशाच्या समाधीशी रडे मुक्ताई नि:शब्द'*

किंवा

*'वृक्षांनी द्यावी छाया...फुलांनी दरवळावं*
*निर्झरांनी खळाळत झेपावत जावं*
*तितक्याच सहजतेनं शिंपत आले वात्सल्य आजवर...*

असं ..., सुसंस्कारित आणि सश्रद्ध मन कवयित्रीला लाभलेलं आहे व या बहुतांशी कवितांतून ते भरभरून व्यक्त झालं आहे. दुहिता, कांता, माता अशा विविध भूमिकातूनही कवयित्री समरसतेने व्यक्त झाली आहे. मात्र प्रासंगिक काव्यरचना, विभूतीपूजक रचनांच्या



अनुक्रमणिका

आकर्षणातून कवयित्रीने आता मुक्त व्हावे. संवेदनशील आणि सुसंस्कृत मन लाभलेल्या या कवयित्रीच्या हातून अधिक रसपूर्ण काव्य निर्माण होईल, असा दिलासा हा काव्यसंग्रह निश्चितच देतो, असे नोंदवून ठेवतो.

*'वळणावरून' : कवयित्री सौ. सुषमा गरुड, धुळे.*
*चेतश्री प्रकाशन, अमळनेर, प्रथमावृत्ती एप्रिल ९७, पृष्ठे डेमी ८०, मूल्य रु. ६०/-*

□

## रसिकांना शांतविणारं 'काहूर'

कविवर्य प्रा. वसंत दीक्षित गेली ४०-४५ वर्षे काव्यक्षेत्रात आहेत. अबोध मनातील व आसपासाच्या परिस्थितीतील स्पंदने शब्दबद्ध करण्याचा त्यांना छंद आहे. निवेदनात ते म्हणतात, 'माझी कविता अनेक भावसत्यावर वावरणारी आहे. तृप्त, अतृप्ततेतही माझी संवेदना वावरलेली, काहूरलेली असते... मनाला स्पर्श करणारा अनुभव तरल संवेदनेने स्वीकारत असतो...' अशी स्पष्ट आणि पारदर्शी काव्यभूमिका असणाऱ्या कवीची कविताही अस्सल, आश्वासक आणि प्रत्ययकारी असणार या श्रद्धेनं रसिक 'काहूर' संग्रहाचे वाचन करू लागतो व वरील काव्यगुणांची त्याला प्रचीती येऊ लागते.

संग्रहात एकूण ४४ कविता आहेत. कवीचा हा तिसरा काव्यसंग्रह असल्यामुळे हा संख्यात्मक संकोच असावा का? १५ ऑगस्ट, सैनिका, क्रूस, युद्ध, एके ४७, चंगळवाद अशी सुरुवातीची नावे वाचून कवीची समाजाभिमुखता लक्षात येते. १५ ऑगस्टसारखा गुळगुळीत झालेला विषय देखील कवीने अतिशय आटोपशीर व लयबद्ध शब्दात मांडला आहे. कणाकणातून स्वातंत्र्याची सुगंधी फुले उधळली गेली आहेत व या भूमीवर अमरत्व देणारे अमृत शिंपडले जात आहे, अशी शिव आणि सुंदराची भावना कवी येथे व्यक्त करतो. मात्र स्वातंत्र्य काळात नागरिकांचा झालेला भ्रमनिरास पाहून 'अजून सावध रहा सैनिका' अशी हाक तो देतो आणि म्हणतो,

*'तुडवायाची लाख आम्हाला क्रूर शत्रूची मत्तदळे...*
*आज आमुच्या संयकातला सहनशील तो तोल ढळे...'*

अशा पद्धतीने कवीचा आकांत प्रकट होत राहतो. रुढी, क्रूस, युद्ध, एके ४७ आदि कवितातून वैफल्य, निराशा, हतबलता, एकाकीपणा, सामाजिक विषमता यांचे वास्तवदर्शी सूर उमटतात. 'मी रोज मरून जगत असतो. माझं जगणं एके ४७ रायफलमधल्या गोळीसारखं असतं. माणूस म्हणून मी या जीवन रहाटीतल्या यात्रेत सामील झालो खरा पण दु:ख संपवण्याचे माझे प्रयत्न अजून थिटेच पडतात...' असा विषाद कवी प्रकट करतो.

आयुष्याच्या वाटचालीत होणारी स्थित्यंतरे आणि त्यानुसार येणारे अनुभव व बदलणारे चिंतन यातूनच प्रा. दीक्षितांनी निसर्ग व प्रेमकविता तेवढ्याच उत्कटतेने सादर केल्या आहेत. कोजागिरी, श्रावण, कवी श्रावण, ऋतुचक्र या कविता सरस उतरल्या आहेत. 'ऋतुचक्र' (पान ३३) ही कविता मुक्त छंदातली असूनही तिच्यातली अति सुंदर लय रसिकाला नक्कीच आल्हाद

देईल. अष्टाक्षरी छंदातल्या 'माझे रान, माझा पाऊस, माझा वृक्ष, माझा श्वास' वगैरे फार चांगल्या कविता संग्रहात आहेत. विठ्ठलाच्या कविता या शीर्षकाखाली कवीने आगळा-वेगळा प्रयोग केला आहे. सामाजिक विषमता, दांभीकता, भ्रष्टाचरण, बदलती समाजमूल्ये, वेदरकारी, स्वार्थ आदि विसंगतीपूर्ण आचरणावर नेमके बोट ठेवले आहे. या कवितातील उपहासगर्भता परिणामकारक आहे. मात्र निसर्ग काव्य लेखनात कवी खऱ्या अर्थाने खुलत जातो. पुढील ओळी बघा -

*'शीतलसा गूढ चंद्र*
*पांघरून बसलेला*
*स्वप्नावर अजून नीज*
*थेंब दिठी साकळला...*

काही कवितेतून क्वचित कोठे यतिभंग, मात्रा संकोच, अतिरिक्त मात्रा, कल्पना द्विसक्ती, गद्यप्रायता असे दोष आढळतात, पण त्यामुळे एकूण संग्रहाचे सौंदर्य ओसरत नाही. रसिकांच्या मनात प्रकट झालेले 'काहूर' सौंदर्य भावनेने शांतचित्त होते...!

*काहूर : प्रा. वसंत दीक्षित*
*स्फूर्ती प्रकाशन, अहमदनगर, पृष्ठे डेमी ५६, मूल्य रु. ४५/-*

□

## संमीश्र आनंद देणारी कविता

साहित्य संस्कृती मंडळाने अनुदान दिलेला श्री. कुलकर्णी यांचा हा पहिलाच काव्यसंग्रह असून हा एक चांगला संग्रह आहे. नामवंत कवयित्री अरुणा ढेरे यांनी उत्तेजनपर लिहिलेल्या समीक्षेत, 'मनात सैराट फिरणारे एक भिरभिरे असून संभ्रमात सापडलेले भावनिक जग कवितेतून पुढे येते... मात्र ही ताकदीची कविता असून तिच्यात जीवन चैतन्याचे लहान लहान कवडसेही चमकताना दिसतात...' असे म्हटले आहे.आपल्या कवितेबद्दल खुद्द कवीनेही काही निवेदन केले आहे. तो म्हणतो, 'मानवी संबंधाविषयीच्या कुतुहलातून, त्या विषयीच्या सतत चिंतनातून हे कोलाज एका रात्रीत जन्माला आलं... या सगळ्या माणसांभोवती भिरभिरताना माझी कविता फुलत गेली आहे... माणसांमुळे कविता भेटली आहे... वगैरे. या दोनही भूमिकांचा काव्यसंग्रह वाचताना बऱ्याच प्रमाणात उपयोग होतो.

एकूण ८० कविता या संग्रहात अंतर्मूत केल्या आहेत. त्या बहुतांशी मुक्तशैलीत असून काही अपवादात्मक छंदोबद्ध रचना आढळतात. कवीने गझलेच्या अंगानेही काही रचना केल्या आहेत व त्या चांगल्या उतरल्या आहेत. बहुतांशी कवितात प्रेमभावना व तदनुषंगिक विरह, व्यथा, वेदना आणि दु:खाच्या पातळीवर अभिव्यक्ती होते. काहीसा तत्वचिंतनात्मक मनोव्यापारही अनेक कवितातून प्रकटतो. 'सैराट फिरणारे भिरभिरे' हे तेच असावे. जीवनाचं गूढ गांभीर्य तत्त्वज्ञान भरभरून वाहू लागते तेव्हा रसिकांच्या आकलन प्रक्रियेवर देखील हलकासा ताण निर्माण करणाऱ्या मुक्त कविता येथे भेटतात. त्यातील शब्दबंबाळपणा ही एक उणी वाजू.

मात्र काही उत्कट प्रेमाच्या सुंदर कविताही भेटतात. उदा. तूं (पान ५०) ही कविता पहा,

*खोल खोल श्वासावर*
*गर्तेच्या काठावर*
*सावरलो एकदाच... हात तुझा...!*

किंवा

*मी न थेंब मागणार*
*श्वास मंद होतांना*
*मी न थेंब सांडणार... तू निघून जाताना...!*

संग्रहात ३-४ गझल रचना आहेत. त्या तांत्रिकदृष्ट्या ठीक आहेत व त्यातील कारागिरी कलात्मक आहे. 'घोड्यांच्या टापांचे आवाज' आपली वीणा सांभाळत प्रेयसीच्या मैफलीत येणे, दिवे दूर रहाणे, फुलांचे गाव सोडून जाणे, विस्कटलेले श्वास वगैरे प्रतिमात्मक उल्लेख अनेक कवींनी वापरले आहेत. ते या कवीने टाळायला हवे होते. काव्यात्म मन लाभलेल्या एका उमलत्या कवीकडून रसिकांच्या अपेक्षा वाढवणारा हा काव्यसंग्रह नक्कीच आहे. मात्र ही 'खतावणी' बोजड, गुंतागुंतीची आणि शब्दबंबाळ होऊ नये, याचे कवीने भान ठेवावे. यश मिळेलच.

□□

*मानवी संबंधांच्या खतावणीत : कवी सुवर्ण कुलकर्णी*
*प्रकाशक : वंदन प्रकाशन, अमरावती, पृष्ठे डेमी ८८, मूल्य रु. ४०/-*
*डॉ. शंतनु चिंधडे, ९/११४६, 'सुरश्री', लकाकी रस्ता, पुणे ४११ ०१६.*

---

**श्री. कृ. वि. फडके यांचे कडून ग्रंथालयास सप्रेम भेट दि. ३।२।९७**

□**कल्लोळ** (आत्मवृत्त) लीला मस्तकार रेळे : विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३७४, मूल्य ९० रुपये
□**वृद्धत्व :** बाबुराव डोंगरे स्वत: प्रकाशित, पृष्ठे ७१, मूल्य २० रुपये
□**देशाचा संसार :** संकलन - सौ. अंजली ठकार, साधना प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९२, मूल्य १० रुपये
□**मृत्यूचे माहात्म्य :** श्री. हीराभाई ठक्कर, अनुवादक बळवंत काशीकर, प्रकाशक - कुसुम प्रकाशन, अहमदाबाद, पृष्ठे १०४, मूल्य ३० रुपये
□**अमृत तुषार :** संकलन - कुमारी वीणा ओक, प्रकाशक माधवनाथ, बोध प्रसारक मंडळ, पुणे, मूल्य १२ रुपये
□**अमृतधारा :** नी. पु. फडके, प्रकाशक - नी. पु. फडके
□**गिरी भ्रमण गाथा :** श्री. रा. दि. भट
□**हे गुरु शिष्यांची गोठी :** स्वामी माधवनाथ, प्रकाशक स्वत:, पुणे, पृष्ठे ९६, मूल्य १५ रुपये
□**सहज बोलणे हित उपदेश :** स्वामी माधवनाथ, प्रकाशक स्वत:, पुणे, पृष्ठे ८८, मूल्य १८ रुपये
□**कोकण विकास काळाची मागणी :** व.सी. काणे, एकता प्रकाशन, पुणे, मूल्य ५ रुपये
□**दाभोळला काय होणार? :** व. सी. काणे, एकता प्रकाशन, पुणे पृष्ठे १५ मूल्य ३ रुपये

## साहित्यवार्ता

**डॉ. मु. श्री. कानडे, रा. शं. नगरकर संपादित संत तुकारामगाथा : शब्दार्थ-कोश**

संत तुकारामांच्या गाथ्याचे सांस्कृतिक, सामाजिक व भाषिक असे त्रिविध स्वरूपाचे महत्त्व आहे. श्री. माधव चंद्रोबांनी इ. स. १८६२ ते १८६८ पर्यंत पाच भागात हा गाथा संपादित करून प्रथमत: प्रकाशित केला. या घटनेला आता १२५ वर्षे होऊन गेली. परंतु आजतागायात तुकारामगाथ्याचा शब्दकोश तयार झाला नाही. इ. स. १९९८ मध्ये संत तुकारामांच्या जन्माला ४०० वर्षे पूर्ण होतात, त्या निमित्ताने दोन वर्षांपूर्वी असा कोश सिद्ध करण्याचा संकल्प केला गेला. आतापर्यंत गाथ्यातील सर्व शब्दांच्या सूचिकरणाचे काम पूर्ण झाले आहे. या सूचीमध्ये सुमारे दहा हजार शब्दांचा समावेश होईल असे वाटते.

कोशाची रचना अकारविल्हे असून प्रत्येक शब्दाचे व्याकरण अर्थ व निवडक संदर्भ दिलेले आहेत. काही महत्त्वाच्या शब्दांचे सर्व संदर्भ नमूद केलेले आहेत. उदा. विष्णुदास, ज्ञानदेवादि संत इत्यादि कोशाच्या परिपूर्णतेसाठी, एकार्थी जोडशब्द, वाक्प्रचार, फारसी-अरबी शब्द, वृक्ष, वनस्पती, पशु-पक्षी, विशेषनामे इ. परिशिष्टे जोडली आहेत.

या सर्व तपशीलासाठी डॉ. प्र. न. जोशी यांनी तीन खंडात संपादित केलेली सार्थगाथा आधारप्रत म्हणून स्वीकारली आहे. ही प्रत प्रथमत: त्यावेळच्या मुंबई सरकारने पंडितद्वयांकडून संपादित करून दोन खंडात १८६९-१८७३ या काळात प्रकाशित केली. स्वातंत्र्यानंतर हीच प्रत इ. स. १९५० मध्ये मुंबई सरकारने प्रकाशित केली आहे.

या कोशाला एक विस्तृत प्रस्तावना जोडली आहे, आणि तीमध्ये विविध तुकाराम गाथा आणि तुकारामांच्या शब्दसंग्रहाची वैशिष्ट्ये नोंदविण्याचा प्रयत्न केला आहे. तुकारामांच्या काही शब्दांची पाठचिकित्साही केली आहे. यापूर्वीच्या सार्थ गाथ्यातून अभंगांचे जे अर्थ दिलेले आहेत, त्या संदर्भात काही शब्दांच्या बाबतीत काही नवे अर्थ सुचविले आहेत.

कोशाचे सर्व मुद्रण संपवून हा शब्दकोश १९९८ च्या प्रारंभी अभ्यासकांच्या हाती द्यावा असा संपादकांचा मनोदय आहे.

आपणही अशा प्रकारचे काही वाङ्मयीन उपक्रम, संशोधन करीत असल्यास त्यांची थोडक्यात माहिती म. सा. पत्रिकेकडे अवश्य पाठवावी. योग्य वाटल्यास प्रसिद्धी दिली जाईल.

— संपादक

१. डॉ. मु. श्री. कानडे, ३८४ शनिवार, शंकरछाया अपार्टमेंट, पुणे ४११ ०३०.
२. रा. शं. नगरकर, ७७, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका



म. श्री. दीक्षित

# दिवाळी अंक १९९६ उल्लेखनीय

वैविध्यपूर्ण साहित्याने परिपूर्ण दिवाळी अंकांची संख्या मोठी आहे. अनेक संपादक अतिशय विचारपूर्वक दिवाळी अंकांची निर्मिती करीत असतात. परंतु या अंकांचा प्रसार आणि प्रचार योग्य प्रकारे होऊ शकत नाही. या संपादकांना आपल्या दिवाळी अंकांची जाहिरात वृत्तपत्रांतून करणे परवडत नाही. वृत्तपत्रे अत्यंत थोडक्यात दिवाळी अंकांचा परिचय करून देतात. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात प्रकाशित होणाऱ्या दिवाळी अंकांत काही अत्यंत महत्त्वपूर्ण लेख प्रसिद्ध होतात. त्या त्या विषयाच्या वाचकांना त्याचा पत्ताही लागत नाही. म्हणून आम्ही पुढील जंत्रीत १९९६ मधील उपलब्ध झालेल्या दिवाळी अंकातील विविध विषयांवरील उल्लेखनीय ललितेतर अशा विचारप्रधान लेखांचा उल्लेख केला आहे. लेखांबरोबर चर्चा, परिसंवाद, यांचाही समावेश आहे. निवडीबाबत मतभेद निर्माण होऊ शकेल. वर्णानुक्रमे नियतकालिकाचे नाव, संपादकाचे नाव आणि त्याखाली उल्लेखनीय लेखन, चर्चा, परिसंवाद असा क्रम ठेविला आहे.

वाचकांनी या प्रयत्नाबद्दलच्या आपल्या प्रतिक्रिया अवश्य कळवाव्यात. ही सूची देण्यास थोडा उशीर झाला आहे हे खरे! पुढील वर्षी मार्च (१९९८) अंकात ही सूची देण्याचा प्रयत्न करू. संपादकांनी दिवाळी अंक सप्रेम भेट म्हणून पाठवावेत.

**अंतर्नाद :** भानु काळे

व्यंकटेश माडगूळकरांची चित्रकला — वसंत सरवटे

संपादक पटवर्धन आणि मी — चंद्रकांत वर्तक

**अबकडइ :** चंद्रकांत खोत

(पुनर्जन्म - एक सांगोपांग विचार)

शिवाजी सावंत, दुर्गा भागवत, राजाभाऊ गवांदे इत्यादींचे लेख.

**अधिष्ठान :** मनोहर पांचाळ

आपलं गणगोत - लक्ष्मण लोंढे

न्यायाधीश, सत्ताधीश आणि आपण — चंद्रशेखर धर्माधिकारी

समकालीन मराठीचा चेहरामोहरा — केशव मेश्राम

ईश्वरनिष्ठांची मांदियाळी (चर्चा) — प्रा. राम शेवाळकर, शिरीष पै, बाबा महाराज सातारकर

**अनुराधा :** ब्रह्मानंद नाडकर्णी

वर्तिला शांत रसे - भालचंद्र गुजर

घरातले अण्णा (विद्याधर गोखले) —
शुभदा दादरकर
**अमृत :** मनोहर शहाणे,
अरविंद द. पोतनीस
लंडनचे ग्लोब नाट्यगृह — सीताराम मेणजोगे
मराठीतील दोन प्रवासवर्णनं (यात्रा कल्पकता
आणि तीर्थयात्राप्रबंध) — चंद्रकांत वर्तक
**अभिजात :** स्मिता पटवर्धन
कचरा समस्येवर आणि सलीम अली
जन्मशताब्दीनिमित्त अनेकांचे लेख
**अक्षर :** निखील वागळे
एक माणूस कलावंत (रत्नाकर मतकरी) —
मुलाखतकार — कमलाकर नाडकर्णी
अच्युतराव — मधू लिमये
एक रंगयात्री (प्रभाकर बर्वे)— प्रभाकर कोलते
हेन्री लॉंग लुआ (चित्रपट इतिहासाचा जनक)
— अशोक राणे
**आनंद गंघाली :** म. के. वर्तक
भारतीयांचे धर्मशास्त्र : स्वरूप, व्याप्ती आणि
उपयुक्तता —— मो. दि. पराडकर
पाच अंगाची पांचाली —— गंधाली म. वर्तक
**आपला मराठी बाणा :** राजा राजवाडे
मराठी भाषा व साहित्य गौरव अंक. 'मराठीचे
भवितव्य' या विषयावर विचारमंथन:
शिरवाडकर, मं. वि. राजाध्यक्ष, म. द.
हातकणंगलेकर, सुभाष भेंडे, मधु मंगेश
कर्णिक, नारायण सुर्वे , राजाभाऊ गवांदे,
रामदास भटकळ आदींचा सहभाग.
**उत्तम कथा :** वैजयंती काळे
वास्तुरचनेशी आरोग्याचा संबंध —
हरिभाऊ लिमये
नोकरी करणाऱ्या स्त्रियांचे आरोग्य —
उर्जिता जैन
**कथाश्री :** अशोक लेले, प्रकाश पानसे
(स्त्री-पुरुष प्रेम विशेषांक)
दुर्गा भागवत, गौरी देशपांडे, शांता ज. शेळके,
विद्या गोखले, बाबू मोषाय, दीपक घाटे यांचे
लेख.
**कलाकुंज :** महेंद्र देशपांडे
'माझा नवरा सुरेख बाई' या परिसंवादात
निवेदिता अशोक सराफ, रूही बेर्डे, अलका
कुबल-आठल्ये, पद्मश्री कदम, निशीगंधा वाड
यांचा सहभाग.
अहंकार विमूढात्मा कर्ताहमिती मन्यते —
शिवाजी सावंत
**कलासागर :** विलास गुजर आणि इतर सहा
कलेचे रसग्रहण — जे. बी. दीक्षित
कालनिर्णय : जयंत साळगावकर
अवदानपंचक — दुर्गा भागवत
आर्थर कोस्लर — विश्वास पाटील
घरातले ठाकरे — विलास पवार
'गांधी' साकारताना — अतुल कुलकर्णी
**किस्त्रीम :** ह. मो. मराठे
हलाखीचे दिवस — मुख्यमंत्री मनोहर जोशी
आमची माधुरी — स्नेहलता दीक्षित
संशोधक (य. दि. फडके) —
मुलाखत : नीला उपाध्ये
**केसरी :** अरविंद व्यं. गोखले
गोवे लढ्याचा साक्षीदार — जयंतराव टिळक
क्रौंच काव्य : सुरेशचंद्र वारघडे
रसिकराजा शृंगारराजा (भर्तुहरि) —
वसंत पटवर्धन
**गस्त :** चांद यसूफ शेख
मेघदूतातील सुरम्य अलका —
ज्ञानेश्वर कुलकर्णी
स्त्रियांची सामाजिक बांधिलकी —
शीला मराठे
**गावकरी :** द. शं. पोतनीस

अक्काबाईंच्या फेऱ्यातील देश —
चंद्रकांत वर्तक
हृदयनाथ मंगेशकर (साथसाथ) —
शांता शेळके
**गोमन्तक :** चंद्रकांत घोरपडे
असे आहोत आम्ही मराठी साहित्यिक
— सुरेश भट
स्वप्रसाद (प्रसाद सावकार
यांचे आठवणीकथन)
शब्दांकन - रामनाथ पै रायकर
असामान्यांचे उध्वस्त संसार —
बाळ सामंत
मला उमगलेले विनोबा —
प्रा. राम शेवाळकर
**गृहशोभा :** भालचंद्र जोशी
नारी तू नारायणी (कुंती) — वि. ल. शिंत्रे
रतिसुखाचा प्रणेता शुक — गजानन कुलकर्णी
**चित्रलेखा :** माधुरी कोटक, हरकिसन मेहता
माथेरानची म्हातारी (ट्रेन) राज असरोंडकर
**चैत्राली :** रमेश द. पाटील
(घरदार विशेषांक)
रामकृष्ण पंडित (दुर्मिळ ग्रंथ, वस्तू यांचे
संग्राहक) शब्दांकन - रमेश द. पाटील
**चौफेर :** राजन खान
'औषधशाखा व उपचारपद्धती' विषयावर
लेखन
विपश्यना : एक अनुभव - रंगा मराठे
प्रसारमाध्यमातील स्त्रियांचा सहभाग —
स्वाती महाळंक
**तरुणभारत :** ल. त्र्यं. जोशी
संमिश्र सरकारे (परिसंवाद) — रामकृष्ण
हेगडे, विठ्ठलराव गाडगीळ, प्रमोद महाजन
इ. मुलाखती
मुस्लिम महिला —
मृणालिनी गडकरी, नफिसा हुसेन
**त्रिकाळ :** जयंत टिळक
(मुले, शिक्षण, संस्कार विशेषांक) —
राम जोशी, भारदे इ.चे लेख
**दीपावली :** अशोक कोठावळे
मृत्यू : एक अतीव काव्यमय व परमगंभीर
सत्य — दुर्गा भागवत यांची मुलाखत : प्रतिभा
रानडे
हमखास हसवणारी हास्यचित्रे (गवाणकर) —
वसंत सरवटे
गालिब, हमें न छोड — नंदिनी आत्मसिद्ध
**नाट्यदर्पण :** सुधीर दामले
गीतकार, संगीतकार यशवंत देव अभिवादन
विशेषांक
**नीहार :** स्नेहसुधा कुलकर्णी
विज्ञान साहित्य विशेषांक —
सोहनी, अविनाश कांबळे, प्र. न. जोशी,
स्वाती सामक इ. लेख
**पालकनीति :** शुभदा जोशी व इतर
कला आणि आपण — अनिल अवचट,
तालाचा समतोल — आनंद मोडक
नृत्य रंगी रंगले — रोहिणी भाटे
**पुढारी :** प्रतापसिंह ग. जाधव
लो. टिळक आणि महर्षि शिंदे — रमेश जाधव
संत आणि प्रपंच — यू. म. पठाण
**पैलतीर :** कृष्णा राव
श्री ज्ञानेश्वर संजीवन समाधी विशेषांक
गुरव यांचे ९ लेख
**प्रभात :** उद्धव तेजे
पत्रकारिता समाजप्रबोधनाचे साधन की
पांढरपेशा दहशतवाद — वि. आ. बुवा
**प्रसाद :** मनोहर य. जोशी
गायत्रीरहस्य - एस. ए. कुलकर्णी
**बायजा :** सौदामिनी राव

दलित चळवळ व दलित स्त्रियांचा प्रश्न/ राजकारण — अर्चना हातेकर
**महाराष्ट्र टाइम्स** : कुमार केतकर
श्रीकेतन कमळ — लीला अर्जुनवाडकर
मुंबईचा कोंडमारा —
अशोक दातार, कुमार केतकर
सद्गुणमंजिरी (एक हात भागिनी) —
प्रतिभा रानडे
**मानिनी** : माधव कानिटकर
वीणा सहस्रबुद्धे यांचे जीवनगाणे — नंदा सुर्वे
**मिळून साऱ्याजणी** : विद्या बाळ
पाध्ये आणि पाध्ये (प्रभाकर पाध्ये)
रेखा इनामदार-साने
आप्पा, शकुआत्या, सई (आणि मी पण)
— गौरी देशपांडे
राजरत्न काशीवाई ( हेरलेकर) —
अरुणा ढेरे
**मुद्रा** : राजन खान
साहित्यअश्वथ्थ कुसुमाग्रज — शिवाजी सावंत, ज्ञानेश्वरीप्रणीत श्रवणकल्पना —
गो. म. कुलकर्णी
मराठी साहित्यातील राजकारणाचे चित्रण —
ग. प्र. प्रधान
**मेनका** : पु. वि. बेहेरे
महाराणी गायत्रीदेवी (जयपूर) यांच्या 'ए प्रिन्सेस रिमेंबर्स' आत्मकथेचा परिचय —
मधुकर जावडेकर
**मौज** : श्री. पु. भागवत
मी आणि नाटक — विजय तेंडुलकर,
कबीर : एक मुक्तचिंतन — पाडगावकर,
'कोसला' वाचल्यावर — पु. ल. देशपांडे,
'नव्या प्रजासत्ताकाचा जन्म' (परिसंवाद) मधु दंडवते, सत्यरंजन साठे, भा. ल. भोळे, य. दि. फडके, कुमार केतकर, बी. जी. देशमुख, पळशीकर, अविनाश धर्माधिकारी
**रसिक** : राजेंद्र बनहट्टी
नाट्यसमीक्षकाची सुख-दु:खे —
वि. भा. देशपांडे
आसामातील भ्रमंती — नीला पांढरे
**रुचि** :
आधुनिकता आणि भारतीय साहित्य :
चंद्रकांत बांदिवडेकर
**ललना** : वसंतकुमार सराफ
आयुर्वेद शिक्षण व उपचारविषयक लेख
**ललित** : अशोक कोठावळे
आलों होतों, आलीं होतें — (मर्ढेकर विषयक)
- म. वा. धोंड
अभिव्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक बांधिलकी आणि आविष्कारावरील बंधनं —
वसंत आ. डहाके
अभिजात आणि लोकप्रिय साहित्य (परिसंवाद) — शांताराम, विलास खोले, निशिकांत मिरजकर, विश्वास पाटील.
चित्रपटाला मराठी साहित्याने काय दिले (चर्चा) — भाई भगत, गंगाधर महांबरे, शांता शेळके, बाबू मोशाय
**लोकप्रभा** : प्रदीप वर्मा
वाल्मिकीची लावण्यवती सीता —
श्री. र. भिडे
**वनराई** : वर्षा गजेंद्रगडकर
(निवारा आणि पर्यावरण विशेषांक)
मोहन धारिया, मधुकर ढवळीकर, द्वा. भ. कर्णिक, व्ही. आर. कृष्ण अय्यर यांचे लेख
**वसुंधरेचा श्रावण** : शेखर नानजकर
मेळघाट — किरण पुरंदरे
वनमानवाची संशोधिका (विरुटे गाल्डिकास)
— सविता घाटे
**विवेक** : दिलीप करंवेळकर










**साप्ताहिक सकाळ : सदा डुंबरे**
माझा साक्षात्कारी हृदरोग — डॉ. अभय बंग
**साहित्यसूची :**
मो. द. नांदुरकर, अनिल बळेल
कायापालट विशेषांक — परिवर्तित साहित्य प्रकारांबाबत लेख — शांता शेळके, रत्नाकर मतकरी, ज्योत्स्ना देवधर, ह. मो. मराठे. सुरेशचंद्र पाध्ये, रवींद्र भट, दत्ता टोळ इत्यादि
**ऋतुरंग : अरुण शेवते**
'घर' विषयक विशेषांक
घराच्या आठवणी — य. दि. फडके, कुमार केतकर, सुभाष अवचट, रामदास भटकळ
आत्मचरित्रं एकांगी वाटतात (दुर्गा भागवत यांची मुलाखत — मंगला आठलेकर
**सुवासिनी : अविनाश केळकर**
मी आणि माझा संसार (मुलाखती) — नंदा सुर्वे यांनी विद्या अभिषेकी, रजनी फुले, मीना अरुण दाते, रश्मी ठाकरे, मृणालिनी शिवाजी सावंत यांच्या घेतलेल्या.
'कुसुम मनोहर लेले'ची जन्मकथा — विनीता ऐनापुरे
ना. ह. आपटे यांच्या पत्नीची मुलाखत — मंदा खांडगे
**हंस : आनंद अंतरकर**
गंधर्व मंडळींच्या 'द्रौपदी'चे महाभारत — सीताकांत लाड ☐☐

म. श्री. दीक्षित, ८६५ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

---

**सौ. वीणा विजापूरकर यांचेकडून देणगी दाखल आलेली पुस्तके**

- ❑ **प्रेक्षकांनी क्षमा करावी - घरमालक :** वसंत सबनीस.
- ❑ **मद्राशीने केला मराठी भ्रतार :** वसंत कानेटकर
- ❑ **बोल घेवड्या :** ना. धो. ताम्हनकर
- ❑ **वेगळं व्हायचंय मला :** बाळ कोल्हटकर
- ❑ **कौंतेय :** वि. वा.शिरवाडकर
- ❑ **एक होता म्हातारा :** मोतिराम रांगणेकर
- ❑ **कोणे एके काळी :** मोतिराम रांगणेकर
- ❑ **हसली माझी व्यथा :** दि. वि. जोशी
- ❑ **मी किंवा तू :** मो. ग. रांगणेकर
- ❑ **बिऱ्हाड वाजलं :** रत्नाकर मतकरी

---






अनुक्रमणिका







## साभार पोच

- **भाव पुष्पांजली :** वैद्य रामचंद्र शिवराम मराठे, श्री. वामनराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७८, मूल्य ४३ रुपये
- **टाचा टिंभा :** लहु कानडे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९८, मूल्य ७० रुपये
- **गीता दर्शन :** या. रा. जाधव, निर्मल प्रकाशन, नांदेड, पृष्ठे २४०, मूल्य ७५ रुपये
- **नादरंग :** मधु जामकर, विद्याभारती प्रकाशन, लातूर, पृष्ठे ६८, मूल्य ५० रुपये
- **सुश्लोक ऋतु संहार :** रामचंद्र चिंतामणी श्रीखंडे, रघुराज प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ४१
- **सलील वाघ, निवडक कविता :** संकलन - जयंत गाडगीळ, टाइम स्पेस कम्युनिकेशन, पुणे, पृष्ठे १२२, मूल्य ८५ रुपये
- **पैंजण :** बा. बा. कोटंवे, संजय सप्लायर्स प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८८, मूल्य ५० रुपये
- **चित्र :** रजनी परुळेकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७५, मूल्य ६० रुपये
- **नाद अंतरातला :** शरद पिदडी, ललित प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६२, मूल्य ५० रुपये

**निहारा प्रकाशन पुणे, यांची प्रकाशने**

- **पाऊसवेळ :** शशी देरेकर, पृष्ठे
- **अवस्था :** रवींद्र भा. वेंद्र, पृष्ठे ४८, मूल्य १९ रुपये
- **आकाश पेलताना :** राम मेस्त्री, पृष्ठे ६४, मूल्य १७ रुपये
- **अंतरीची वेदना :** राजाभाऊ भोजाळ, पृष्ठे ११२, मूल्य २६ रुपये

**पालवी प्रकाशन पुणे, यांची प्रकाशने**

- **मोराचा पिसारा व इतर गोष्टी :** राजाराम आफळे, पृष्ठे ३१, मूल्य १५ रुपये
- **अब्राहम लिंकन :** ज्योत्स्ना चांदगुडे, पृष्ठे ४०, मूल्य २५ रुपये
- **मृत्यू माघारी गेला :** शांता निसाळ, पृष्ठे २८, मूल्य १२ रुपये
- **अशी आमची राष्ट्रभाषा :** संजीवनी बोकील, पृष्ठे २८, मूल्य १२ रुपये

**गमभन प्रकाशन यांची प्रकाशने**

- **जंगलातील गुपीत :** मंदा खांडगे, पृष्ठे ८०, मूल्य ४० रुपये
- **पाखरांची शाळा :** ग. ह. पाटील, पृष्ठे ३२, मूल्य १५ रुपये
- **चंद्रावरचा ससा :** ग. ह. पाटील, पृष्ठे ३२, मूल्य १५ रुपये
- **माझी जीवनयात्रा :** लिलाबाई भालजी पेंढारकर, शब्दांकन - अर्जुन नलावडे, सुरेश एजन्सी, पुणे, पृष्ठे १२६, मूल्य १०० रुपये
- **भोग उघाण :** जयवंत वैती, ग्राहक मित्र प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १०८, मूल्य ६० रुपये
- **कवितेचा गाव :** मराठी कुमार बाल साहित्य सभा, कोल्हापूर, पृष्ठे ३२, मूल्य १२ रुपये
- **गोष्टी मजेमजेच्या :** मराठी कुमार बाल साहित्य सभा, कोल्हापूर, पृष्ठे ५६
- **तुझ्यासाठी :** जोगिंदरकौर महाजन, जगजितसिंह प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ८८, मूल्य ५० रुपये
- **काहुर :** वसंत दीक्षित, स्फूर्ती प्रकाशन, अहमदनगर, पृष्ठे ५६, मूल्य ४५ रुपये

- **निर्मोही :** माधुरी हुद्देदार, स्फूर्ती प्रकाशन, अहमदनगर, पृष्ठे ५६, मूल्य ४५ रुपये
- **श्वासनिश्वास :** सी. बी. दोडती, सप्तर्षि प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७३, मूल्य ५० रुपये
- **रंगाचा थवा :** निलिमा गुंडी, शिव प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२, मूल्य १५ रुपये
- **साधना :** सुरेश हरि थत्ते, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६, मूल्य ४० रुपये
- **बळीवंत :** श्रीकांत देशमुख, केदार सप्लायर्स प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९२, मूल्य ४५ रुपये
- **तिसरी बाजू :** मोहन कुलकर्णी, चौफेर प्रकाशन, कराड, पृष्ठे, ११०, मूल्य १०० रुपये
- **वृक्षवेध :** शा. प्र. दीक्षित, मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०, मूल्य ७० रुपये

**स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, यांची प्रकाशने**

- **मराठ्यांचा इतिहास :** अ. रा. कुलकर्णी, प्र. न. देशपांडे, पृष्ठे २४६, मूल्य १०० रुपये
- **घुंगुरवाळा :** इंदिरा संत, पृष्ठे १५२, मूल्य १२० रुपये
- **स्त्री समस्या आणि आजचे नाटक :** मधुरा कोरान्ने, पृष्ठे १८४, मूल्य १३० रुपये
- **आधुनिक जगाचा इतिहास (भाग १ व २) :** अ. रा. कुलकर्णी, प्र. न. देशपांडे, पृष्ठे १६२, मूल्य ७५ रुपये, (भाग १) पृष्ठे १७६, मूल्य १०० रुपये (भाग २)
- **मिथक वाणी :** उषा बंबावाले, पृष्ठे १९२, मूल्य १०० रुपये
- **कायदा कोश :** दिलीप शिंदे, पृष्ठे १६८, मूल्य १०० रुपये
- **तीन ताल मधील खून व धर्मराज माहुलकर :** पृष्ठे ४८, मूल्य २५ रुपये
- **मधुमेह (आहार नियोजन) :** डॉ. जयश्री गोडसे व मंजुषा जाधव, पृष्ठे ५७, मूल्य ३५ रु.
- **उन्ह उतरणीनंतर :** विलास माळी, मायबोली प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६१, मूल्य २२ रुपये
- **मद्रासची मराठी हस्तलिखिते :** वसंत स. जोशी, राज्य मराठी विकास संस्था प्रकाशन, पृष्ठे २०८, मूल्य १५० रुपये
- **गतिधारा :** मिरदेव गायकवाड, नवीन उद्योग प्रकाशन, पृष्ठे १०४, मूल्य ८० रुपये

**साहित्य अकादमी प्रकाशन, मुंबई, यांची प्रकाशने**

- **निवडक सदानंद रेगे :** वसंत आबाजी डहाके, पृष्ठे २२९, मूल्य ९५ रुपये
- **निवडक रा. भि. जोशी :** निलीमा भावे, पृष्ठे २२०, मूल्य ९० रुपये
- **बोरकरांच्या निवडक कविता :** प्रभा गणोरकर, पृष्ठे २३२, मूल्य १२५ रुपये

**श्री विद्या प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने**

- **वृक्षगान :** शरदिनी डहाणुकर, पृष्ठे ९६, मूल्य १२५ रुपये
- **समाजस्पंदने :** अरुण टिकेकर, पृष्ठे १५९, मूल्य २५० रुपये
- **हलकंफुलकं :** सुभाष भेंडे, पृष्ठे १६२, मूल्य २०० रुपये
- **गड्या आपुला गांव बरा :** सुभाष भेंडे, पृष्ठे ९८, मूल्य १२५ रुपये
- **जगत्‌गुरु इब्राहिम अदिल शहा :** सदाशिव आठवले, पुणे, पृष्ठे १७९, मूल्य २०० रुपये
- **भाषा विवेक :** मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, पृष्ठे २०८, मूल्य २०० रुपये
- **नारीभक्षक :** विलास मनोहर, पृष्ठे २६५, मूल्य २५० रुपये
- **शुक्रवारची कहाणी :** प्रतिभा रानडे, पृष्ठे २०८, मूल्य १६० रुपये

- **परिक्रमा :** लता राजे, पृष्ठे ३००, मूल्य २५० रुपये
- **आर्त :** रोहिणी करंदीकर, पृष्ठे ७०, मूल्य ६० रुपये
- **विसाव्या शतकातील महाराष्ट्र :** य. दि. फडके, पृष्ठे ५०६, मूल्य ३५० रुपये

**मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, यांची प्रकाशने**

- **आपुलोनी अवकाशे :** दीपक घारे, पृष्ठे १५२, मूल्य १०० रुपये
- **वंचिता :** विद्यादेवी परचुरे, पृष्ठे १२४, मूल्य १०० रुपये
- **डायरी :** पंकज कुरुळकर, पृष्ठे १६०, मूल्य १०० रुपये
- **महामाता :** गो. श्री. बनहट्टी, पृष्ठे ६०, मूल्य ५० रुपये
- **महासागर :** बाळ राणे, पृष्ठे ४१०, मूल्य २५० रुपये
- **बहर :** गोविंद तळवलकर, पृष्ठे १७८, मूल्य १२० रुपये
- **पांढरा बुधवार :** प्रेमानंद गज्वी, पृष्ठे ५७, मूल्य ६० रुपये
- **गंमत गाणी :** अशोक दातार, घरकुल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २८, मूल्य १५ रुपये
- **फुलोरा :** अशोक दातार, घरकुल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २८, मूल्य १५ रुपये
- **उन्मेषा :** प्रतिनिधिक कवितासंग्रह : पद्मगंधा प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ८४, मूल्य ५० रुपये
- **समग्र दिवाकर :** सरोजिनी वैद्य, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६९४
- **जय भारत जननी :** गोविंद केळकर, मिलिंद प्रकाशन, बेळगाव, पृष्ठे ४०, मूल्य ३० रुपये
- **वळणावरचे साकव :** चंद्रकांत वर्तक, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७१, मूल्य १०० रु.
- **वळणावरून :** सुषमा गरुड, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ७९, मूल्य ६० रुपये

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद, यांची प्रकाशने**

- **उदक :** लक्ष्मीकांत देशमुख, पृष्ठे २११, मूल्य १३० रुपये
- **माणूस नावाचा शत्रू :** गणपत व्यास, पृष्ठे २४, मूल्य १५ रुपये
- **समुद्रातील राज्यात राजू :** सुभाष वसेकर, पृष्ठे १६, मूल्य ८ रुपये
- **मोराचं पीस :** मुळावकर संतोष, पृष्ठे २४, मूल्य १५ रुपये
- **परीचे अश्रू :** सुभाष वसेकर, पृष्ठे १६, मूल्य ८ रुपये
- **फुलझडी :** इंदुमती जोंधळे, पृष्ठे २४, मूल्य १५ रुपये
- **मित्र जीवाचा खरा :** लीला शिंदे, पृष्ठे १६, मूल्य ८ रुपये
- **कीर्ती सौरभ :** संपादक भालचंद्र वि. धर्माधिकारी, विश्वकर्मा प्रकाशन, सातारा, पृष्ठे ३६९, मूल्य २०० रुपये
- **जगा आणि जगू द्या :** डॉ. वसंत सांगळे, पार्टनर पब्लिकेशन, मुंबई, पृष्ठे ९३, मूल्य ६० रुपये
- **स्फूर्तीलहरी :** भालचंद्र जोशी, स्फूर्ती प्रकाशन, नगर, पृष्ठे ६४, मूल्य ५० रुपये
- **एकावनी :** आशा भिडे, विदर्भ लेखक संघ प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ६४, मूल्य ४० रुपये

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, यांची प्रकाशने**

- **भंगलेले अभंग :** विलास पाटील, पृष्ठे १०४, मूल्य ४० रुपये

- **वनातील वृक्षवेली :** शा. प्र. दीक्षित, पृष्ठे २५४, मूल्य ८० रुपये
- **जीवाणू खत :** प्रा. प्रभाकर रसाळ व पी. एल. पाटील, पृष्ठे २४०, मूल्य १२० रुपये
- **जोजोबा लागवड :** शिवाजी ठोंबरे व व. सी. खुस्पे, पृष्ठे १२०, मूल्य ७० रुपये
- **कुर्यात सदा टिंगलम्, कुर्यात पुन्हा टिंगलम् :** शिवराज गोर्ले, पृष्ठे १४२, मूल्य ६० रुपये
- **साहित्याचे नवीन भाषा तत्त्वज्ञान :** वि. ना. ढवळे, पृष्ठे १७३, मूल्य १०० रुपये
- **स्पंदनाची किमया :** उषादेवी विजय कोल्हटकर, पृष्ठे १२०, मूल्य ६० रुपये
- **वानवळा :** अ. गो. कुलकर्णी, सुप्रिया प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२०, मूल्य ३० रुपये
- **श्रीमत प. प. भगवान श्रीधर स्वामी यांचे सिद्ध चरित्र :** सदाशिव पांडुरंग कुलकर्णी, प्रकाशक स्वत: लेखक, पृष्ठे ३८८, मूल्य २५० रुपये
- **कोरडे नक्षत्र :** प्रकाश होळकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६२, मूल्य ५० रुपये
- **गांधी-विनोबांची पत्रे :** संपादक : डॉ. मु. वा. शहा, प्रकाशक : उ. म. वि. धुळे, पृष्ठे १८१, मूल्य ७५ रुपये

**आरती प्रकाशन, डोंबिवली यांची प्रकाशने**

- **रुजवा :** रेणू दांडेकर, पृष्ठे १०४, मूल्य ५० रुपये
- **हास्यकथा :** बाळकृष्ण देव, पृष्ठे ११४, मूल्य ५० रुपये
- **कॉल ऑफ द टायगर :** लालू दुर्वे, पृष्ठे १९०, मूल्य १०० रुपये
- **मन करा रे प्रसन्न :** संपादन - उल्हास कोल्हटकर, पृष्ठे १२०, मूल्य ५० रुपये

**वेदवाणी प्रकाशन, कोल्हापूर यांची प्रकाशने**

- **हिंदू धर्मातील व्रतवैकल्ये :** पृष्ठे १४४, मूल्य ६० रुपये
- **तुमचे पौराहित्य तुम्हीच करा ! :** भाग पहिला : पृष्ठे २९६, मूल्य ८५ रुपये

**खालील पुस्तके शुभदा गोगटे यांनी ग्रंथालयास सप्रेम भेट दिली आहेत.**

- **खंडाळ्याच्या घाटासाठी :** शुभदा गोगटे, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३५२, मूल्य १५० रुपये
- **माजिनत्स :** शुभदा गोगटे, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३४, मूल्य २५ रुपये
- **यंत्रायणी :** शुभदा गोगटे, विश्वमोहिनी प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७१, मूल्य ३० रुपये
- **स्त्री माझे नाव असे :** अनुवादक : मीना वांगीकर, निहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०, मूल्य १०० रुपये
- **नादब्रह्म :** संपादिका डॉ. सरोजिनी बाबर, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीचे प्रकाशन पृष्ठे २५८, मूल्य ५५ रुपये

□□

## कार्यवृत्त
## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

### (जानेवारी ते मार्च १९९७)

**दि. १८ जाने. १९९७ :** कै. वि. द. घाटे स्मृतिदिनानिमित्त प्रा. शरद वाघ यांचे 'शैक्षणिक आव्हाने : आजची आणि उद्याची' या विषयावर भाषण झाले. प्रास्ताविक - कल्याणी दिवेकर, आभार - रत्नाकर कुलकर्णी

**दि. २० जाने. १९९७ :** कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक श्री. अशोक जैन यांच्या 'कानोकानी' या पुस्तकास देण्यात आले. प्रकाशक - प्रदीप चंपानेरकर, रोहन प्रकाशन, पुणे. पारितोषिकाची रक्कम - लेखक रु. १५००/-, प्रकाशक-रु. १०००/- सूत्रसंचालन - डॉ. कल्याणी दिवेकर, आभार - रत्नाकर कुलकर्णी

**दि. २३ ते ३१ जाने. १९९७ :** या कालावधीत का. र. मित्र व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती. थोर साहित्यिक वि. स. खांडेकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त आठ व्याख्याने योजण्यात आली होती.

सर्वश्री न. म. जोशी, आनंद यादव, चंद्रकांत बांदिवडेकर, मधु जामकर, लक्ष्मीकांत तांबोळी, लीला गोविलकर, नागनाथ कोत्तापल्ले व गं. ना. जोगळेकर यांची (अनुक्रमे) भाषणे होऊन खांडेकरांच्या कार्याचे उचित स्मरण करण्यात आले.

सर्व भाषणांना उत्तम प्रतिसाद मिळाला. वि. स. खांडेकर यांच्या द्वितीय कन्या श्रीमती कल्पलता खरे यांनी शेवटच्या दिवशी भाऊसाहेबांच्या घरगुती हृद्य आठवणी सांगितल्या. तसेच रु. १५०००/- ची देणगी परिषदेस देऊन परिषदेच्या स्तुत्य कार्यक्रमाबद्दल संतोष व्यक्त केला. या देणगीच्या व्याजातून दरवर्षी कै. वि. स. खांडेकर यांचा स्मृतिदिन साजरा करण्याचे ठरले आहे. या उदार देणगीबद्दल परिषद श्रीमती कल्पलता खरे यांची आभारी आहे.

**दि. १० फेब्रुवारी १९९७ :** कै. नरहर कुरुंदकर स्मृतिदिनानिमित्त व नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या जन्मशताब्दीनिमित्त श्री. वि. स. वाळिंबे यांचे 'भारतीय स्वातंत्र्यलढा व नेताजी' या विषयावर भाषण झाले.

**दि. १९, २० व २१ फेब्रु. ९७ :** रोजी मराठी विभाग, पुणे विद्यापीठ यांच्या सहकार्याने ज्येष्ठ समीक्षक डॉ. व. दि. कुलकर्णी यांची 'ज्ञानेश्वरीचे काव्यसौंदर्य' या विषयावर प्रा. रा. श्री. जोग व्याख्यानमालेत उद्बोधक व्याख्याने झाली.

**दि. २१ फेब्रु. १९९७ :** प्रा. रा. श्री. जोग पारितोषिक या वर्षी डॉ. वा. के. लेले यांच्या 'शैलीशास्त्रज्ञ यामह' या समीक्षा ग्रंथास मिळाले. हा ग्रंथ मानसन्मान या प्रकाशन संस्थेने प्रकाशित केला आहे. लेखकास रु. ३५००/- तर प्रकाशकास रु. ७५०/- चे पारितोषिक सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. व. दि. कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आले.

**दि. २५ फेब्रु. १९९७ :** मा. कृष्णराव फुलंब्रीकर जन्मशताब्दीनिमित्त पुणे विभागाचे

आयुक्त श्री. सुधाकर जोशी यांचे ' मास्टर कृष्णराव यांची गायकी ' या विषयावर भाषण झाले. दरवर्षी मा. कृष्णराव फुलंब्रीकर स्मृतिदिन साजरा करण्यासाठी फुलंब्रीकर कुटुंबियांनी परिषदेस रु. ११,१११/- ची देणगी दिली आहे. या उदार देणगीबद्दल परिषद फुलंब्रीकर कुटुंबियांची आभारी आहे. प्रास्ताविक - गं. ना. जोगळेकर, आभार - रत्नाकर कुलकर्णी

**दि. २६ फेब्रु. १९९७ :** पिलाजीराव फडर्णीस स्मृति-व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. डॉ. मीना प्रभू (लंडन) यांचे 'इंग्लंडमधील राजा आणि प्रजा' : काल आणि आज' या विषयावर भाषण झाले.

**दि. २७ फेब्रु. १९९७ :** कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कुसुमाग्रज पारितोषिक डॉ. दिलीप कुलकर्णी यांच्या 'एका अस्वस्थ वळणावर ' या काव्यसंग्रहास मिळाले. हा काव्यसंग्रह उन्मेष प्रकाशन, पुणे या संस्थेने प्रकाशित केला आहे. कवीस रु. १५००/- तर प्रकाशकास रु. १०००/- व प्रमाणपत्र असे या पारितोषिकाचे स्वरूप आहे. हा समारंभ ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. परीक्षकांतर्फे डॉ. अश्विनी धोंगडे व डॉ. शंतनु चिंधडे यांची भाषणे झाली. या प्रसंगी कवी दिलीप कुलकर्णी, प्रकाशिका मेधा राजहंस यांनी मनोगते व्यक्त केली. सूत्रसंचालन - डॉ. कल्याणी दिवेकर, आभार - रत्नाकर कुलकर्णी.

**दि. २८ फेब्रु. १९९७ :** डॉ. शं. दा. पेंडसे जन्मशताब्दीनिमित्त डॉ. हे. वि. इनामदार यांचे ' संतसाहित्याचे मर्मज्ञ भाष्यकार-डॉ. पेंडसे ' या विषयावर भाषण झाले. डॉ. शं. दा. पेंडसे यांचे पुत्र श्री. केशव पेंडसे आणि श्रीमती कमलाबाई भट यांचीही यावेळी भाषणे झाली. या समारंभाचे अध्यक्षपद विधान परिषदेचे सभापती मा. जयंतराव टिळक यांनी भूषविले.

**दि. १० मार्च १९९७ :** कै. यशवंत दिनकर पेंढरकर पारितोषिक या वर्षी ह. शि. खरात यांच्या 'गोची' या काव्यसंग्रहाला मिळाले. हा काव्यसंग्रह शुभा प्रकाशन, मुंबई यांनी प्रकाशित केला आहे. या समारंभाच्या अध्यक्षस्थानी (७० व्या अ. भा. म. सा. संमेलनाचे अध्यक्ष) श्री. ना. सं. इनामदार होते. परीक्षकांतर्फे डॉ. शरद देव यांचे भाषण झाले.

**दि. ११ मार्च १९९७ :** कै. ना. गो. चापेकर स्मृति-व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. डॉ. कुमार सप्तर्षि यांचे ' सद्य:स्थिती व सामाजिक बांधिलकी ' या विषयावर भाषण झाले. श्रोत्यांनी विचारलेल्या अनेक प्रश्नांना डॉ. कुमार सप्तर्षि यांनी उत्तरे दिली. प्रास्ताविक - गं. ना. जोगळेकर, आभार - रत्नाकर कुलकर्णी

**दि. १२ मार्च १९९७ :** रोजी दिवाळी अंक पारितोषिक वितरणाचा समारंभ आयोजित करण्यात आला होता. १) अ. स. गोखले स्मृत्यर्थ दिले जाणारे 'रत्नाकर' पारितोषिक यंदा 'विशाखा' या दिवाळी अंकास मिळाले. संपादक श्री. ह. ल. निपुणगे यांनी ते स्वीकारले. २) श्री. चंद्रकांत शेवाळे, संपादक ग्रहांकित यांनी पुरस्कृत केलेली दिवाळी अंकाची तीन पारितोषिके अनुक्रमे साधना, साप्ताहिक सकाळ व विचार-शलाका या अंकांना मिळाली. ३) अनंत काणेकर स्मृत्यर्थ दिले जाणारे पारितोषिकही साप्ताहिक सकाळमधील श्री. अभय बंग यांच्या 'माझा साक्षात्कारी हृद्रोग'' या लेखास मिळाले.

दिवाळी अंकाला परिषदेकडून दिल्या जाणाऱ्या तीन पारितोषिकांची रक्कम वाढवून रु. १०००/- करण्यासाठी श्री. चंद्रकांत शेवाळे यांनी रु. ३०,०००/-ची भरघोस देणगी परिषदेस दिल्याबद्दल आणि ही देणगी परिषदेकडे येण्यासाठी ह. ल. निपुणगे यांनी विशेष प्रयत्न केल्याबद्दल परिषद सर्वश्री शेवाळे आणि निपुणगे यांची आभारी आहे. तसेच सा. सकाळला मिळालेल्या का. र. मित्र पारितोषिकाची रक्कम रु. १०००/- परिषदेस देणगी म्हणून दिली याबद्दल सा. सकाळचे संपादक श्री. सदा डुंबरे यांची परिषद आभारी आहे.

**दि. १९ मार्च १९९७ :** 'माणूस'कार श्री. ग. माजगावकर यांचे १९ फेब्रुवारीस दीर्घ आजाराने निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली शोकसभा आयोजित करण्यात आली होती. या शोकसभेत सर्वश्री स. ह. देशपांडे, वि. ग. कानिटकर. वि. स. वाळिंबे, रंगा मराठे, कुमार सप्तर्षि व मेधा राजहंस यांची भाषणे झाली. श्रद्धांजलीचा ठराव कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी वाचून दाखविला.

**दि. २० मार्च १९९७ :** कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त डॉ. दिलीप धोंगडे यांचे ' मर्ढेकरांची कविता : एक आकलन ' या विषयावर भाषण झाले.

**दि. २९ मार्च १९९७ :** कै. शं. ना. जोशी पारितोषिक या वर्षी श्री. गजानन मेहेंदळे यांच्या 'श्री राजा शिवछत्रपती खंड १ भाग - १ ' या ग्रंथास देण्यात आले. हा समारंभ श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली झाला. प्रास्ताविक - गं. ना. जोगळेकर, सूत्रसंचालन व आभार - कल्याणी दिवेकर.

## महत्त्वाच्या देणग्या

१) महाराष्ट्रातील थोर संस्कृत-पंडित आणि भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्थेचे संचालक डॉ. रा. ना. दांडेकर यांनी परिषदेच्या नवती-महोत्सवासाठी रु. ९०००/- ची देणगी दिली.

२) आळंदी देवस्थानचे विश्वस्त व परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य श्री. सु. वा. जोशी यांनी परिषदेला देवस्थानच्या वतीने रु. १०,००० ची देणगी दिली.

३) परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे भूतपूर्व सदस्य बॅ. विठ्ठलराव गाडगीळ यांनी 'समग्र काका' (न. वि. गाडगीळ यांचे २२ खंडातील वाङ्मय) हा संपूर्ण संच म. सा. प. च्या ग्रंथालयास भेट म्हणून दिला. परिषद या सर्व उदार देणगीदारांची ऋणी आहे.

## म. सा. प. धुळे शाखा

**दि. २४ जाने. १९९७ :** भाऊसाहेब देशपांडे स्मृतिदिनानिमित्त कवी-संमेलन आयोजित करण्यात आले होते. या कवी-संमेलनात सर्वश्री किशोर पाठक, प्रताप लोके, संजय चौधरी, भगवान ठाकूर व प्रा. आपमोटे यांचेबरोबर नवोदित कवींनीही भाग घेतला. अध्यक्षस्थानी पुरुषोत्तम पाटील होते. प्रास्ताविक - अर्चना हातेकर, सूत्रसंचालन व आभार - बी. वी. महाजन.



अनुक्रमणिका

**दि. ३१ जाने. १९९७ :** म. सा. प. धुळे जिल्हा शाखा व गरुड वाचनालय, धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. श्रीराम अत्तरदे लिखित 'फट म्हणता ब्रह्महत्या ' या नाट्यछटा-संग्रहाचा प्रकाशन समारंभ आयोजित केला होता. या समारंभात सर्वश्री पी. के. पाटील, चंद्रकांत पांढरे व नीला पांढरे यांची भाषणे झाली. श्री. रंगनाथ कुलकर्णी व प्रा. सुभेदार सुर्वे यांनी या नाट्यछटा-संग्रहातील एक एक नाटिका सादर केली.

समारंभाचे अध्यक्षस्थानी प्रा. ल. भा. कुटकुटे होते. सूत्रसंचालन - अर्चना हातेकर, आभार - बी. बी. महाजन.

### म. सा. प. उल्हासनगर शाखा

**दि. ५ फेब्रु. १९९७ :** रोजी काव्यवाचनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. या कविसंमेलनात सर्वश्री अनिल साठे, प्रल्हाद देशपांडे, व. शं. खानवेलकर, अमिता कोकाटे व अन्य स्थानिक कवींनी भाग घेतला. सूत्रसंचालन - श्री. शुक्राचार्य गायकवाड यांनी केले. आभार - प्रल्हाद चौधरी यांनी मानले.

### म. सा. प. ठाणे जिल्हा शाखा

**दि. २३ फेब्रु. १९९७ :** रोजी कथाकथनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. यात कु. भाग्यश्री कासखेडीकर व सौ. राधिका गुप्ते-पारसनीस यांनी भाग घेतला होता.

**दि. १६ मार्च १९९७ :** कै. वि. स. खांडेकर जन्मशताब्दीनिमित्त प्रा. मंगला आठलेकर यांचे 'खांडेकर साहित्यदर्शन' या विषयावर भाषण झाले. प्रास्ताविक व स्वागत पद्माकर शिरवाडकर यांनी केले तर आभारप्रदर्शन चांगदेव काळे यांनी केले.

### म. सा. प. श्रीरामपूर शाखा

**दि. ८ मार्च १९९७ :** रोजी शाखेमार्फत दोन समारंभ आयोजित केलेले होते. स्थानिक कवी बाबासाहेब सौदागर यांचा, शाखेचे अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. स्वागत कार्याध्यक्षा मीनाताई जगधाने यांनी केले. आभार कार्यवाह दिनकर पोखरकर यांनी मानले.

याच समारंभाच्या दुसऱ्या सत्रात कवी-संमेलन आयोजित केलेले होते. स्थानिक आणि जवळपासच्या गावातून सुमारे ४० कवी या संमेलनास उपस्थित होते. सौ. मीनाताई जगधाने अध्यक्षस्थानी होत्या. सूत्रसंचालन कार्यवाह बाबूराव उपाध्ये यांनी केले तर आभार प्रदर्शन कार्यवाह दिनकर पोखरकर यांनी केले.

### म. सा. प. डोंबिवली शाखा

**दि. २२ फेब्रु. १९९७ :** रोजी ब्राह्मण सभा डोंबिवली व म. सा. प. डोंबिवली शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने कै. वि. स. खांडेकर जन्मशताब्दीनिमित्त व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती.

या व्याख्यानमालेचे पहिले पुष्प प्रा. आशालता कांबळे यांच्या 'कथाकार खांडेकर' या विषयावरील भाषणाने गुंफण्यात आले होते.



अनुक्रमणिका

अध्यक्षस्थानी डॉ. गो. पं. कुलकर्णी होते तर प्रमुख अतिथी म्हणून श्री. नकुल पाटील उपस्थित होते.

## म. सा. प. इस्लामपूर शाखा

**दि. १८ व १९ जाने. १९९७ :** या दिवशी शाखेच्या वतीने ५ वे मराठी साहित्य संमेलन व सांगली जिल्हा म. सा. प. सभासद मेळावा आयोजित करण्यात आला होता.

या समारंभाचे अध्यक्षपद डॉ. नागनाथ कोतापल्ले यांनी भूषविले होते, तर उद्घाटक मा. विश्वासराव पाटील आणि स्वागताध्यक्ष ॲड. बी. एस. पाटील होते.

या संमेलनात निमंत्रितांचे कवी-संमेलन, परिसंवाद विषय - वाङ्मयीन चळवळी : वस्तुस्थिती आणि अपेक्षा, चर्चासत्र विषय-'मान्यवर साहित्यिकांच्या सहवासातील आठवणी' व 'साहित्याकडून माझ्या अपेक्षा' असे विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आलेले होते.

या वेगवेगळ्या कार्यक्रमात प्रा. वसंत केशव पाटील, कराड, डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्याध्यक्ष, म. सा. प. पुणे व प्रा. वैजनाथ महाजन, सांगली, यांनी अध्यक्षस्थान भूषविले. तर परिसंवाद आणि चर्चासत्रात प्रा. रवींद्र ठाकूर, प्रा. राजेंद्र कुंभार, श्री. हरी नरके, प्रा. भगवान ठाकूर, प्राचार्य विश्वास सायनाककर, डॉ. मंगला कोकाटे, डॉ. वि. रा. तोडकर. प्रा. शरद भोसले, डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. मधुकर हसमनीस, प्रा. दीपा देशपांडे, प्रा. प्रदीप शिरसाट पाटील व श्री. दिलीप पाटील इत्यादींनी भाग घेतला.

शाखा मेळाव्यात सांगली जिल्ह्यातील सुमारे ४०० सभासदांनी व रसिकांनी उपस्थिती नोंदविली. मेळाव्याचे उद्घाटन मा. दिलीपराव पाटील यांनी केले. उद्घाटक म्हणून बोलताना दिलीप पाटील म्हणाले, 'साहित्याची जाण असणारी राजकीय माणसे सुसंस्कृत असतात. राजकारण आणि साहित्यिकारण यात दुरावा नाही. साहित्यातही राजकारण चालते, पण त्याचे स्वरूप सुसंस्कृत असते.'

डॉ. गं. ना. जोगळेकर आपल्या भाषणात म्हणाले, ' साहित्यिक वातावरण जोपासणे, रसिकांवर संस्कार करणे, साहित्यावद्दल जागृती निर्माण करणे ही परिषदेची उद्दिष्टे आहेत. परंतु त्यांच्या पूर्ततेसाठी परिषदेला बळकटी निर्माण झाली पाहिजे.

आज परिषदेचे ५००० हून अधिक सभासद आहेत. ती संख्या वाढायला हवी. माणसाला जवळ करा, असे साहित्य सांगते. साहित्य जो आनंद देते तो कायम टिकणारा असतो. ग्रंथ तुमची आयुष्यभर सोवत करतात. साहित्यिकाबरोबर चांगले वाचक निर्माण होणे गरजेचे आहे. यासाठी साहित्य परिषदेच्या वतीने विविध उपक्रम राबवले जात असून, या उपक्रमांना सभासदांचे सहकार्य लाभायला हवे.'

शाखा मेळाव्याचे प्रास्ताविक व स्वागत डॉ. मधुकर हसमनीस यांनी केले. तर प्रा. प्रदीप शिरसाट पाटील यांनी आभार मानले. सूत्रसंचालन कार्यवाह विलास कुलकर्णी यांनी केले.

**श्री. रत्नाकर कुलकर्णी,** कार्यवाह

□□

अनुक्रमणिका






Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57



अनुक्रमणिका




